






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवी । मा प्राकृतीं काय उणीवी ।
नवी जुनीं म्हणावी । कैसेनी केवीं सुवर्णसुमने ।।
देशभाषावैभवें । प्रपंचपदार्थी पालटली नावें ।
परि रामकृष्णादिनामा नव्हे । भाषावैभवें पालटूं ।।
संस्कृतवाणी देवें केली । तरी प्राकृत काय चोरापासूनि झाली ।
असोतु या अभिमान भुली । वृथा बोली काय काज ।।

# मराठी अभ्यास परिषद पत्रिका

**भाषा आणि जीवन**

वर्ष १२ : अंक २ : उन्हाळा : १९९४



अनुक्रमणिका

## अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, मार्च, जून, ऑक्टोबर)
**संपादन-समिती :** कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द.दि. पुंडे, प्र.ना. परांजपे, मॅक्सीन बर्नसन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७ (दूरध्वनी ३३६०६१ / २४)
**मुखपृष्ठ :** एकनाथी भागवत १ : १२३, १२४, १२६, १२७
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवणे, पुणे ४११ ००४. (दूरध्वनी ३३३८६९)
**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पाहा.
**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.
या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.

---

संपादक : कल्याण काळे / प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा / मुद्रणस्थळ : संगम प्रेम प्रा.लि., कोथरूड, पुणे २९.

संपादकीय

# वापरातून जात चाललेले शब्दप्रयोग

- आशा मुंडले

लहानपणी असे वाटायचे, की पाऊस पडायला लागला, की त्याच दिशेने चालत जाऊन, तो सुरू कुठे होतो, तिथे पोचावे आणि एक पाय ओला, तर एक सुका, असे उभे राहावे. पुढे भाषाशास्त्र शिकताना ध्वनिव्यवस्थेतला बदल, व्याकरणातले इतर बदल असेच पकडावेसे वाटले. त्यांपैकी 'करावयाला' ऐवजी 'करायला' हा रूपबदल माझ्या आठवणीत, कानांत रुजला. इतकेच नव्हे, तर पूर्वी जुने रूप वापरणारी व्यक्ती नवे रूप वापरताना आढळली आणि झक्क वाटले.

त्या मानाने शब्दांचा लोप निरखायला सोपा. त्याला सामाजिक बदलाचा भक्कम आधार पुष्कळदा सापडतो. असेच काही माझ्याच पिढीत हरवलेले शब्द पाहू या. अर्थात शिक्षित बोलीमधले. 'विटाळशी' बसली, बाहेर बसली, दूर बसली, तीन दिवसांची रजा, कावळा शिवला, मासिक रजा हे समानार्थी वाक्प्रचार आता वापरात नाहीत. घरातले पुरुष तीन दिवस स्वयंपाक करू शकायचे, तेही गेलेच. आता टीव्हीवरच्या नॅपकिनच्या जाहिरातीत 'ते दिवस' असे म्हणतात.

'काय, रे, रिकामटेकड्या, हजामती करतोस का?' हे पण गेले. चांभारचौकशा संपल्या. 'म्हारडा माजलाय्' गेले. 'रांडेच्या' सारख्या शिव्या गेल्या. जातीवरून बिन-दिक्कत अपमानास्पद बोलायची प्रथा गेली. छान झाले. काही कायद्याच्या भयाने; पण बऱ्याच अंशी मनातही बदल झाला आहे.

'पायातली वहाण पायात' नाही. 'गरीब गाय मुलगी आहे, डोळे झाकून करा' असे म्हणणारे मध्यस्थ नाहीत. 'रेशमी सासुरवास' हा शब्दप्रयोग वापरला जात नाही. पण या क्षेत्रात मात्र दुर्दैव असे, की लग्न करणे ही अजून निदान नव्वद टक्के लोकांना स्वतः करायची गोष्ट वाटत नाही. कुणी तरी पुढाकार घेऊन दाखवतात, पाहतात वगैरे. आणि सासुरवास तर कायम आहेच. पण पूर्वी नसलेला सूनवासही भरपूर आढळतो.

घरी आलेल्या नवरीची वाखाणणी 'वस्तुलाभ उत्तम' अशी होत नाही. पत्रिका छापताना 'वर नेमस्त केला आहे' किंवा 'चि. कमलचा शरीरसंबंध अमुकांशी' असे

लिहीत नाहीत. पण वृत्ती मात्र अजून पूर्ण काही बदलली नाही. इंग्रजांच्या मराठीत सांगायचे, तर 'जुनीच दारू नव्या बाटलीतून'. गर्भाधान संस्कार होत नाही. मखरात बसवले जात नाही. ते शब्द तोंडात यायचे कारणच पडत नाही.

आंघोळ करताना आता उभेलावणे, आडवे लावणे नाही. स्वच्छता दाराआड गेली. लंगोटी पण गेलीच. पण ब्रा आली, तरी चोळी मात्र शाबूत आहे. उलट, तिच्या 'पीछे' पाहण्याची धामधूम सुरू आहे.

'कासोटा घट्ट आहे' सांगणारी तरुणी आता नाही. आता ज्यूडो शिकावे लागते आहे. श्रीमुखात भडकावली, हग्या मार दिला, 'त्याला काय शष्प, समजतंय्', 'मुलगा' अगदी च्यवलाच', 'मानेवर खडा ठेवून काम करून घ्या' हे गेलं; पण तोंडातून फक्त गेलं.

विठ्ठलसव्वाष्ण हा शब्द आता वापरात नाही. पण स्त्रियांबद्दल बोलण्याची, विचार करण्याची जी तुच्छतावृत्ती आहे ती मात्र बदललेली नाही. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी अनेकांना आश्चर्य वाटलं, की सर्वसामान्य जर्मन मध्यमवर्गीय माणूस असा नृशंसपणे कसा वागू शकला? आपल्याकडले अनेक संभावित, संधी मिळाली, की स्त्रीबरोबर कसे वागतात, हे जर जळगावप्रमाणेच सर्वत्र प्रकाशात आले, तर जगाला असाच धक्का बसेल.

शब्द पुढे सरकले; पण अर्थ काही त्यांच्यामागे धावताना दिसत नाही. नव्या पद्धतीने बोलणे अजूनही 'तोंडची वाफ' याच पातळीवर आहे. कृती जुनीच.

अजून इथे लहान मुलांचा छळ आणि तेजोभंग होतो. अशोभनीय शिक्षा देऊ नये, असे सरकारी पत्रक शिक्षकांसाठी काढायची वेळ येते.

माणसे एकमेकांशी माणसासारखी वागायला लागली, की किती तरी शब्दप्रयोग अर्थासहित नष्ट होतील. उदाहरणार्थ, बलात्कार. पण तो दिवस अजून फार दूर आहे.

बहिणाबाई चौधरींच्या शब्दांत,

'मानसा, मानसा, कधी व्हशील मानूस.''

○○

# संख्यावाचन : एक नवीन दृष्टिकोन

- प्रा. मनोहर राईलकर

*प्रा. राईलकर गणित आणि संख्याशास्त्र अशा दोन्ही विषयांत एस्. एस्सी. असून पुण्याच्या स.प. महाविद्यालयात गणित विषयाचे प्राध्यापक होते. जवळजवळ तीस वर्षे ते विभागप्रमुख होते. एका प्राथमिक शाळेचे प्रमुख ह्या नात्याने प्राथमिक स्तरापासून ते थेट एम्. एस्सीला प्रत्यक्ष अध्यापन म्हणून पदव्युत्तर स्तरापर्यंतच्या गणिताशी त्यांचा घनिष्ठ संबंध आला. पुणे विद्यापीठाच्या गणित अभ्यासमंडळाचे सभासद, शालांत परीक्षा मंडळाच्या गणित अभ्यासमंडळाचे सभासद, पाठ्य पुस्तकमंडळाच्या गणितसमितीचे सभासद, इ. अनेक प्रकारच्या संस्थांमध्ये त्यांनी काम केले आहे. संख्यावाचनाबद्दल त्यांना क़ाही मूलभूत स्वरूपाचा बदल अपेक्षित आहे. पाहू या, ते काय म्हणतात, ते.*

*–संपादक.*

भारतात आज रूढ असलेल्या विविध भाषांचे संख्यावाचनाच्या पद्धत्यनुसार दोन मुख्य गट पडतात, असं म्हणायला हरकत नाही. पहिल्या गटातील भाषांची पद्धत संस्कृतवरून घेतली असल्याचं स्पष्टपणं जाणवतं. यात मराठी, गुजराती आणि उत्तरेकडील सर्व भाषा मोडतात. इंग्रजीचाही एक भारतीय भाषा म्हणून अंतर्भाव करायला हरकत नाही, इतकी ती आपल्या जीवनाचा भाग बनून गेली आहे. दुसऱ्या गटात सर्व दाक्षिणात्य भाषांचा व इंग्रजीचा अंतर्भाव करता येईल.

संस्कृतमध्ये संख्यावाचनाचा नियम 'अंकानां वामतो गतिः।' म्हणजे 'अंक (उजवीकडून) डावीकडे वाचावेत,' असा आहे. १४७ ही संख्या सप्त-चत्वारिंशत् अधिक शतम् अशी वाचतात. म्हणजे 'सात-चाळीस आणि एकशे'. म्हणूनच मराठीत आपण पाढे म्हणताना 'सत्तेचाळासे' असं म्हणत असतो. पण संख्यावाचनाचा हा नियम सुद्धा आपण, म्हणजे मराठीनं धडपणं पाळला आहे, असं दिसत नाही. पाढ्यांव्यतिरिक्त वरील संख्या आपण 'एकशेसत्तेचाळीस' अशीच वाचतो. याचा अर्थ, लिहिण्याचा क्रम १-४-७, तर वाचण्याचा क्रम मात्र १-७-४ असा! अधिक मोठ्या संख्यांच्या वाचनात तर हा गोंधळ आणखी प्रकर्षानं





अनुक्रमणिका

जाणवतो. उदाहरणार्थ, ३५७४ ह्या संख्येच्या पस्तीसशेचौऱ्याहत्तर अशा वाचनातील अंकांच्या वाचनाचा क्रम ५-३-४-७ असा असल्याचं दिसून येईल.

संस्कृतमधून घेतलेली ही 'वामतो गती' व्यवहारात आणि प्रत्यक्षात फक्त दोन अंकी संख्यांपुरतीच मर्यादित राहिली असल्याचं आढळून येतं. आपण प्रौढ व्यक्ती तिचा अवलंब अनेक वर्षं करीत आलो आहोत. परिणामी, आपल्या ती इतकी अंगवळणी पडली आहे, की संख्या प्रथमच शिकणाऱ्या बालकांचे आपल्या ह्या गोंधळाच्या पद्धतीमुळं किती हाल होतात, याची आपल्याला जाणीवच होत नाही. लिहिण्याचा क्रम आणि वाचण्याचा क्रम परस्परांच्या अगदी उलट. लिहायचे ५-७, म्हणायचं पाचावर सात आणि वाचायचं सत्तावन्न. लिहायचे ८२, म्हणायचं आठावर दोन, पण वाचायचं ब्याऐंशी. किती गोंधळ! त्यातही, नव्याण्णव सोडले तर १९, २९,........८९ ह्या संख्यांचा गोंधळ तर काही विचारूच नका. प्रौढांनीही प्रौढी मिरवू नये, इतका गोंधळ प्रौढ व्यक्ती अजूनही करीत असतात. 'एकूणसत्तर, असं तोंडी सांगितलं, तर ७९ लिहायचं, की ६९? असा संभ्रम क्षणभर भल्याभल्यांना होतो आणि ६९ चं वाचन करताना एकूणसाठ म्हणायचं, की एकूणसत्तर? हाही प्रश्न पडतो. पडतो, की नाही? प्रामाणिकपणं स्वतःच्या मनाशीच उत्तर द्या. वास्तविक, संस्कृतमध्ये ६९ करता नवषष्टि आणि एकोनसप्तति असे दोन्ही पर्याय आहेत. (यांचं शब्दशः मराठी रूपांतर, नवसट आणि परिचित एकोणसत्तर असं देता येईल.) तरीही मराठीनं हा अवघड पर्याय का स्वीकारला असावा, हे कळत नाही. नव्याण्णव हे रूप जर आपल्याला चालतं, तर नवतीस, नवचाळीस, ...... नवसट, इ. रूपं का चालू नयेत? मराठीतल्या दोषांवर श्री. शंकर विनायक जोशी यांनी आपल्या 'कन्नड- प्रबोध' ह्या पुस्तकात बरोबर बोट ठेवलं आहे. (प्रकाशक: दि. स्टूडंट्स ओन् बुक् डेपो, धारवाड, इ.स. १९५४.)

हा प्रकार फक्त मराठीतच आहे, असं नाही. आरंभी म्हटल्याप्रमाणं पहिल्या गटातल्या सर्वच भाषांत आहे. पहिल्या गटातल्या बाकी भाषांचं मला इतर फारसं माहीत नाही. पण मराठीत आणखी काही प्रकारचे गोंधळ आहेत, पाहा.

एकवीस, एकतीस आणि एकसष्ट हे तीन प्रकार सोडले, तर एक ही संख्या एक म्हणून आपल्या मूळ स्वरूपात कुठंच आढळत नाही. एके (चाळीस), एका (वन्न, हत्तर) आणि एक्या (ऐंशी, ण्णव), अशा नाना प्रकारे अवतरते.

दोन हा तर कधीच दोन म्हणून येत नाही. त्याची, बा(वीस, वन्न, सष्ट, हत्तर), बत्(तीस), बे(चाळीस), ब्या(ऐंशी, ण्णव) अशी रूपं आढळतात.

तीन सुद्धा तीन म्हणून दिसत नाही. तोही ते(वीस), तेहे(तीस), त्रे (चाळीस, पन्न, सष्ट) आणि त्र्या(हत्तर, ऐंशी, ण्णव) अशा भिन्न रूपांत आढळतो.

चारची तीच गत. चो(वीस, पन्न), चौ(तीस, सष्ट), चव्वे (चाळीस) आणि चौऱ्या(हत्तर, ऐंशी, ण्णव) अशी रूपं तो घेतो.

पाचची कथा वेगळी नाही. त्याची पंच(वीस), पस्(तीस), पंचे(चाळीस), पंचा(वन्न), पा(सष्ट) आणि पंच्या(हत्तर, ऐंशी, ण्णव).

सहासष्टशिवाय इतर कुठंही सहा, सहा म्हणून दिसत नाही. सव्(वीस), छत्(तीस), सेहे किंवा शेहे(चाळीस), छप्(पन्न) आणि शहा(हत्तर, ऐंशी, ण्णव) अशा रूपात तो आढळतो.

सातची सत्ता(वीस, वन्न), सदो(तीस), सत्ते(चाळीस), सदु(सष्ट) आणि सत्त्या(हत्तर, ऐंशी, ण्णव) अशी रूपं दिसतात. सात म्हणून कधीच नाही.

आठ हा अठ्ठा(वीस, वन्न), अडो(तीस), अठ्ठे(चाळीस), अडु(सष्ट) आणि अठ्ठ्या(हत्तर, ऐंशी, ण्णव) अशा विविध रूपांत येतो. आठ म्हणून कधीच दिसत नाही.

पन्नासचा कधी पन्न होतो (त्रेपन्न, चोपन्न, छप्पन्न), तर कधी वन्न होतो (बाकी सर्वत्र). एकोणीस, की एकूणवीस, की एकोणावीस हे वाद आहेत. अठ्ठ्याहत्तर, की अष्ट्याहत्तर? एकसष्ट, की एकसष्ठ, की एकसट? असे आणखीही अनावश्यक वाद आहेतच.

साठ सुद्धा साठ न राहता त्याचा सट (एकसट, बासट, इ.) का व्हावा?

जोडाक्षरं तरी किती? पन्नास, सत्तर आणि नव्वद यांतली जोडाक्षरं कदाचित आपण टाळू शकत नसू. पण बाकीची किती जोडाक्षरं आहेत! सत्रा, सव्वीस, अठ्ठावीस, बत्तीस, पस्तीस, छत्तीस, त्रेचाळीस, चव्वेचाळीस, सत्तेचाळीस, अठ्ठेचाळीस, (पन्नास सोडले), त्रेपन्न, छप्पन्न, सत्तावन्न, अठ्ठावन्न, सगळे सष्ट, शिवाय त्रेसष्ट, त्र्याहत्तर, चौऱ्याहत्तर, पंच्याहत्तर, सत्त्याहत्तर, अठ्ठ्याहत्तर, ब्याऐंशी, त्र्याऐंशी, चौऱ्याऐंशी, पंच्याऐंशी, सत्त्याऐंशी, अठ्ठ्याऐंशी, एक्याण्णव, ब्याण्णव, त्र्याण्णव, चौऱ्याण्णव, पंच्याण्णव, सत्त्याण्णव आणि अठ्ठ्याण्णव! म्हणजे जवळ जवळ निम्म्या नावांत जोडाक्षरं आहेत. (काहीजणांना पंच्याहत्तर वगेरे जोडाक्षरं आहेत, हे मान्य होणार नाही. ही नावं पंचाहत्तर, इ. प्रकारे लिहिता येतात, असा युक्तिवाद ते करू शकतात. तो युक्तिवाद मान्य करायला हरकत नाही.)

आता दुसऱ्या गटातल्या इंग्रजीकडे वळू. 'वन्' पासून 'नाइन'पर्यंतची नावं आणि ट्वेंटी, थर्टी वगैरे नावं एकदा माहीत झाली, की मुलांना वीसनंतर कसलाच त्रास पडत नाही. या शिवाय ११ ते १९ या संख्यांची नावं सुद्धा पाठ हवीत, हे उघड आहे.

पण दुसऱ्या गटातल्या चार दक्षिणी भाषांचं वैशिष्ट्य तर लक्षणीय आहे. त्या





अनुक्रमणिका

भाषांत दहानंतरच म्हणजे प्रथमपासूनच हा प्रयोग सुरू होतो. वाचकांच्या माहितीसाठी चार दक्षिणी भाषांतली १ ते १९ पर्यंतच्या संख्यांची नावं कोष्टकात दिली आहेत.

| संख्या | तेलुगु | तमिळ | मलयाळम् | कन्नड |
|---|---|---|---|---|
| १. | ओकटि | ओण्णु | ओन्नु | ओंदु |
| २ | रेंडु | रेंडू | रंटु | एरडु |
| ३ | मूडू | नून्नु | नून्नु | मूरू |
| ४ | नालुगु | नालु | नालु | नाल्कु |
| ५ | ऐदु | अंजु | अंजु | ऐदु |
| ६ | आरु | आरु | आरु | आरु |
| ७ | एडु | एळु | एळु | एळु |
| ८ | एन्मिदि | एट्टु | एट्टु | एटु |
| ९ | तोम्मिदि | ओंबदु | ओंपत्तु | ओंबत्तु |
| १० | पदि | पत्तु | पत्तु | हत्तु |
| ११(१० आणि १) | पदकोंडु | पदिनोंडु | पदिनोन्नु | हन्नोंदु |
| १२(१० आणि २) | पंड्रेंडु | पदिरेंडु | पंत्रंटु | हन्नेरडु |
| १३(१० आणि ३) | पदमुडु | पदिमुन्नु | पदिमून्नु | हदिमूरु |
| १४(१० आणि ४) | पद्दनालुगु | पदिनालु | पदिनालु | हदिनाल्कु |
| १५(१० आणि ५) | पदिनैदु | पदिनजु | पदिनचु | हदिनैदु |
| १६(१० आणि ६) | पदिहारु | पदिनारु | पदिनारु | हदिनारु |
| १७(१० आणि ७) | पदिहेडु | पदिनेळु | पदिनेळु | हदिनेळु |
| १८(१० आणि ८) | पदिनेन्मिदि | पदिनेट्टु | पदिनेट्टु | हदिनेंटु |
| १९(१० आणि ९) | पत्तोम्मिदि | पत्तोंबदु | पत्तोंबदु | हत्तोंबत्तु |

(स्थानपरत्वे उच्चारभिन्नता आढळते. उदा., कन्नडमध्ये ओंदु ऐवजी वंदु असंही म्हणतात. मी एकच पर्याय दिला आहे. संख्यांबद्दलची ही माहिती श्री.वि.दि. नरवणे यांच्या भारतीय व्यवहारकोशातून घेतली आहे.)

संधी करताना आणि बोलताना कालपरत्वे मूळ स्वरूपात खूपच बदल होऊन त्यांची मोडतोड झाली आहे, हे खरं आहे. उदाहरणार्थ, कन्नड भाषेत हत्तु (१०) आणि ओंदु (१) यांचा संधी हन्नोंदु असा झाला. पण मूळ तत्त्व कायम राहिलं असल्याचं आढळून येईल. या चार भाषांचं वैशिष्ट्य असं, की हे तत्त्व त्यांनी ११ ते १९ह्यांनाही लागू केलं आहे. तसं इंग्रजीतही आढळत नाही.

आपणही ह्या तत्त्वाचा किंवा ह्या रीतीचा अवलंब करायला काय हरकत आहे? असं करण्यानं आपण आपल्या बालकांची अनाठायी वाया जाणारी शक्ती वाचवू शकू. म्हणजे, दहानंतर अकरा, बारा, इ. ऐवजी दहा- एक, दहा-दोन,....., दहा-नऊ, वीस, वीस-एक, इत्यादी प्रकारे वाचन करण्याचं ठरवायला काय हरकत

आहे? वर उल्लेखिलेल्या सर्व अडचणींचा परिहार होऊन जाईल. ११ ही संख्या शाळांतून, घरोघरी 'एकावर एक अकरा' अशी शिकवली जाते आणि तिचा अर्थ दहा आणि एक असा सांगितला जातो. पण ही संख्यावाचन पद्धत अवलंबली, तर मुलं दहा-एक असं वाचणार असल्यानं स्थानिक किंमत हा गणितामधला विषय न शिकवताही समजू शकेल. प्रचलित पद्धतीनं शिकलेल्या आपल्या सर्वांना खूप जड जाईल, यात शंका नाही. तसं पाहिलं, तर आजही आपल्याला सेंटीमीटरमध्ये सांगितलेली उंची, किलोमीटरमध्ये सांगितलेलं अंतर, हे समजायला अडचण येतेच. पण नव्या पिढीला त्यात काहीच अडचण येण्याची शक्यता नाही.

शिवाय यामुळं आपण एका अर्थानं चारी दक्षिणी भाषांच्याही पुढं जाऊ. कारण त्या भाषांत कालपरत्वे झाली, तशी मोडतोड आता होण्याचा संभव नाही. शिवाय आपण याचा अवलंब करून उत्तर भारतातील भाषांनाही एक चांगलं उदाहरण घालून देऊ, तो लाभ वेगळाच.

मात्र हा बदल होण्यासाठी सरकारी पातळीवर ठाम निर्णय होणं जरूर आहे. कारण तो सार्वत्रिक व्हायला हवा. त्याकरता आपण ह्या बदलाची आवश्यकता सरकारला पटवून द्यायला हवी. सरकारला पटण्यापूर्वी जनतेला समजावून सांगणंही जरुरीचं आहे. मात्र हा निर्णय शक्य तेवढा लवकर झाला पाहिजे. जितका उशीर होईल, तेवढं ते अवघड होत जाईल.

माझ्या सूचनेवर जाणकारांची, संबंधितांची प्रतिक्रिया जाणून घेण्यास मी उत्सुक आहे.

**गजांजली, ४६, वाळवेकर एस्टेट, पुणे ४११ ००९**

*(आणि संपादकही वाचकांनी प्रतिक्रिया अवश्य पाठवाव्या. काही लक्षात घेण्या-जोग्या गोष्टी : मराठीमध्ये सत्तेचाळासेचा प्रचार कमी होऊन एकशे सत्तेचाळीसने त्याची जागा घेतली; इंग्रजीमध्ये फाइव्ह अँड ट्वेंटीचा प्रचार जाऊन ट्वेंटी फाइव्हने त्याची जागा घेतली; जर्मनमध्ये अजूनही फ्युन्फ रुंट त्स्वान्सिक असाच प्रयोग आहे; चिनी भाषेत ३५७४ तीन- हजार पाच-शंभर सात-दहा चार या पद्धतीने वाचतात. इंग्रजीतला बदल फ्रेंच या राजभाषेच्या प्रभावामुळे झाला असावा. मराठीतला बदल केव्हा झाला? ज्ञानेश्वरीच्या शेवटी 'शके बाराशतें बारोत्तरीं' म्हणून नोंद आहे. तिची आठवण इथे व्हावी. मुद्दा असा दिसतो, की भाषेत प्रा. राइलकर यांनी सुचवलेल्या बदलासारखे बदल घडून येणे अशक्य नाही.*

*दूरध्वनि क्रमांक आणि पिनकोड क्रमांक कसे सांगायचे, याचाही विचार याच संदर्भात व्हायला हवा. चिनी भाषेत ३०७४ तीन-हजार शून्य सात-दहा चार या पद्धतीने वाचतात, याचीही इथे आठवण व्हावी.*

*—संपादक)*

○○

# प्राथमिक स्तरावरील १ ते ५ इयत्तांची मराठीची पाठ्यपुस्तके

- सुनंदा एडके

विषय समोर आला आणि पाठ्यपुस्तके म्हटल्याबरोबर प्रथम डोळ्यांसमोर आली. प्राथमिक शाळेत जाणारी छोटी छोटी मुले. छोट्या पाठीवर मोठ्या अवजड दप्तराचे ओझे वाहणारी! या दप्तरात असतात वह्या आणि पाठ्यपुस्तके, मनात असो, की नसो, आवडो किंवा न आवडो, आनंद मिळो, की न मिळो, हे ज्ञानाचे ओझे या चिमण्या जीवांना नित्य नियमाने घरापासून शाळेपर्यंत व शाळेपासून घरापर्यंत वाहून न्यावंच लागतं! ज्या वयात या मुलांनी हसायचं-खिदळायचं, नाचायचं-बागडायचं, त्या वयात त्यांना ही हमाली का करावी लागते? हे ओझं कुणी, का, कोणता हेतू साध्य करण्यासाठी ठेवलं? वर्षभर हे ओझं वाहिल्यानंतर नेमकं मुलांच्या पदरात काय पडतं? एक ना दोन, अशा प्रकारच्या किती तरी प्रश्नांनी मला भेडसावलं. अखेर एक प्रश्न मनात घर करून बसला, 'मराठीची पाठ्यपुस्तके मुलांच्या मनावर कितपत दडपणाचे ओझे आणतात? की या ओझ्यापासून मुलांना दूर नेण्यास मदत करतात? मराठी भाषेचा विकास तसेच 'शिक्षण म्हणजे व्यक्तित्वाचा सर्वांगीण विकास' ही व्याख्या सार्थ करण्यात ही १ते५ इयत्तांची पाठ्यपुस्तके कितपत वाटा उचलतात? या दिशेने विचार सुरू झाला.

१ते५ इयत्तांची पाठ्यपुस्तके अभ्यासणारी ही मुले साधारणपणे ५ ते १० या वयोगटातील असतात, त्यामुळे ही मराठीची पाठ्यपुस्तके मला कशी वाटतात, यापेक्षा ती पुस्तके अभ्यासणाऱ्या विद्यार्थ्यांना कशी वाटतात, हे जाणून घेणे मला अत्यंत महत्त्वाचे वाटले. म्हणून मी १ ते ५ इयत्तांना मराठी विषय अध्यापनाचा प्रदीर्घ अनुभव आहे, अशा जवळपास पुण्यातील वेगवेगळ्या स्तरांवरील २५ शाळांमधील १०० शिक्षकांना भेटले. त्यांच्या अध्यापन अनुभवावर आधारित त्यांना पाठ्यपुस्तकांचे मूल्यमापन करून देण्याची विनंती केली. मूल्यमापनासाठी त्यांना पुढील मुद्दे देण्यात आले.

**पाठ्यपुस्तक मूल्यमापनासाठी मुद्दे**

| | |
|---|---|
| १) शब्दयोजना | २) वाक्यरचना |
| ३) आशयघनता | ४) अध्ययन अनुभव |
| ५) पाठांची लांबी | ६) संस्कारशीलता |
| ७) मनोरंजकता | ८) मानसिकता |
| ९) कल्पनारम्यता | १०) नवनिर्मितिक्षमता |
| ११) उपयुक्तता | १२) भाषासमृद्धी |

विद्यार्थ्यांच्या भाषिक प्रगतीमध्ये पाठ्यांशाचा वाटा जेवढा महत्त्वाचा, तेवढेच महत्त्व प्राथमिक शिक्षकाच्या अध्यापन-पद्धतीला प्राप्त होते. म्हणजेच पाठ्यपुस्तकांची परिणामकारकता पाठ्यपुस्तकामधील आशय शिक्षिका किती समर्थपणे नेऊन पोहोचवते, यावरही अवलंबून आहेच. म्हणून या वेळी शिक्षकांजवळ ते अध्यापन कोणकोणत्या पद्धतीने करतात, याबाबतही हितगूज केले. शंभर शिक्षकांच्या अध्यापन-पद्धतींबाबत माहिती गोळा करून, त्याचेही पृथक्करण करता पुढील लक्षणीय बाबी आढळल्या.

**प्राथमिक शिक्षकांचे अध्यापन**

| अध्यापन-प्रकार | टक्केवारी |
|---|---|
| * धडे, कविता वाचन करणे | ७३% |
| * स्वतःच्या पाठोपाठ विद्यार्थ्यांकडून ओळ वाचन करून घेणे | ५२% |
| * कविता गायन करणे | ३५% |
| * पार्श्वभूमीसह धडा, कविता वाचन करणे | २७% |
| * अनुरूप माध्यमाचा वापर करून अध्यापन करणे | १८% |

यावरून परिश्रम घेऊन नवनिर्मितिक्षमतेनुसार अध्यापन करण्याकडे शिक्षकांचा कल आढळत नाही.

अशा प्रकारे पाठ्यपुस्तकाविषयी आशय, भाषा, व्याकरण, अध्ययन-अनुभव मांडणी, संस्कारशीलता, उपयुक्तता, इ. बहुतांशी सर्व अंगांनी चर्चा केली. आपल्या पाल्याच्या अभ्यासाकडे विशेष लक्ष पुरविण्यात जबाबदार पालकांशी हितगूज केले. काही प्रातिनिधिक स्वरूपाच्या शाळांतील शिक्षकांकडून विनंती करून अभ्यासपूर्वक तयार केलेले बालभारतीच्या मराठी विषयाच्या पाठ्यपुस्तकाचे तपशीलवार अभिप्राय लिखित स्वरूपात मागविले. १) अभिनव विद्यालय हायस्कूल (मराठी माध्यम), २) सौ. सुशीलाबाई वीरकर हायस्कूल, ३) महानगरपालिका शाळा क्र. ८०, ४) अभिनव

प्राथमिक शाळा, ५) भारती विद्यापीठाची प्राथमिक शाळा या शाळांमधील शिक्षकांनी याबाबत विशेष परिश्रमपूर्वक सहकार्य केले, त्याबद्दल त्यांना धन्यवाद!

या शिक्षकांना मराठीचे अध्यापन करताना काय आढळले? कोणत्या ठिकाणी अडचणी आल्या? कोणता भाग विशेषत्वाने मुलांना आवडला? कोणत्या कारणांमुळे कोणता भाग समजला नाही, तसेच, आवडला नाही, याबाबत त्यांनी तपशिलासह खुलासा केला.

जसे शिक्षकांच्या अध्यापन-अनुभवातून मराठीच्या पाठ्यपुस्तकांची सद्यःस्थिती जाणून घेतली, तसेच मला १ ते ५ इयत्तांमध्ये अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांना मराठीच्या पाठ्यपुस्तकाबद्दल किती प्रेम वाटते, आवडते, समजते, पटते, हेही जाणून घेण्याची अतीव इच्छा होतीच. या मुलांशी मनमोकळेपणाने चर्चा करता यावी, म्हणून मी स्वतः प्रथम १ ते ५ इयत्तांची ही पाठ्यपुस्तके त्यांच्या भूमिकेतून वाचली, अभ्यासली. महत्त्वाचे म्हणजे, ५ ते ११ वर्षे वयोगटासाठी बालचित्रवाणीमार्फत प्रसारित होणाऱ्या कार्यक्रमाशी गेली १२ वर्षे मी जवळून संबंधित आहे. पटकथा-लेखक, निवेदक, कलाकार, इ. प्रकारे मी त्या कार्यक्रमामध्ये प्रत्यक्ष सहभाग साधलेला असून जवळपास ८०हून अधिक शैक्षणिक कार्यक्रमांत माझा सक्रिय सहभाग आहे. या अनुभवाचा उपयोग प्रामुख्याने मला या विद्यार्थ्यांशी जवळीक साधून त्यांच्या मनातील भाव जाणून घेण्यास नक्कीच झाला. ५० च्या जवळपास मुलांशी मनमोकळेपणाने गप्पा मारल्या. १०० हून अधिक मुलांकडून लिखित स्वरूपात अभिप्राय मागविले. मला आवर्जून नमूद करावेसे वाटते, की ५वीतील मुलांनी तर आपले नाव घालून पाठ्यपुस्तकातील कोणता भाग आवडला व कोणता आवडला नाही, हे सकारण लिहिलेले आहे. विद्यार्थ्यांनी प्रामाणिकपणे तसेच मनात काहीही राखून न ठेवता व्यक्त केलेले अभिप्राय मला आवडले व सद्यःस्थिती जाणून घेण्यासाठी उपयुक्त ठरले.

**१ ते ५ इयत्तांच्या मराठीच्या पाठ्यपुस्तकांचा संख्यात्मक आढावा**

| इयत्ता | धडे | कविता | एकूण धडे व कविता |
|---|---|---|---|
| १ली | २२ (अक्षरांचे अवयव) +६ | ४ | ३२ |
| २री | १८ | १० | २८ |
| ३री | १५ | १० | २५ |
| ४थी | १७ | ११ | २८ |
| ५वी | २२ | ९ | ३१ |
| | | एकूण | १४४ |

संख्यात्मक दृष्टिकोनातून विचार केल्यास १ली ते ५वी या पाच वर्षांच्या कालावधीत प्रत्येक मुलाला साधारणपणे दीडशे धडे व कविता मिळून अभ्यासाव्या लागतात; परंतु परीक्षार्थी दृष्टिकोनातून शिक्षक अध्यापन करतात आणि विद्यार्थी अध्ययन करतात. त्यामुळे वरवर विचार करता हा सर्व भाग पूर्ण होतो. विद्यार्थी मराठी विषयात उत्तम गुणही मिळवतात. यशस्वी होतात; पण हा सारा पाठ्यपुस्तकांचा त्यांनी केलेला अभ्यास तात्कालिक स्वरूपाचा असतो. पाठ्यपुस्तकातला तोच आशय चिरकाल स्मरणात राहतो, जो विद्यार्थ्याने मनापासून स्वीकारलेला असतो, जो त्याला आवडलेला असतो, पटलेला असतो, उपयुक्त वाटतो, ज्याचा अंगीकार करून कृतीत उतरवावासा वाटतो. भाषेच्या संस्कारातून व्यक्तिमत्त्व विकास खऱ्या अर्थी होत असतो. म्हणूनच संख्यात्मकतेपेक्षा गुणात्मकता अधिक लक्षणीय ठरते. गुणात्मकतेच्या दृष्टिकोनातून विचार केल्यास १ ते ५ इयत्तांच्या पाठ्यपुस्तकांचा दर्जा उंचावण्यात लक्षणीय वाढ झालेली आहे, तरीही दर्जा वाढविण्यास अद्यापही भरपूर वाव आहे.

**पाठ्यपुस्तकात आढळणाऱ्या लक्षणीय बाबी**

* उद्दिष्टानुसारी आहेत
* भाषाभ्यासातील मूलभूत चार कौशल्ये – समजून ऐकणे, समजून बोलणे, समजून वाचणे व समजून लिहिणे क्रमवार विकसन करणारी आहेत.
* किमान अध्ययन-क्षमता पूर्ण करण्याच्या दृष्टीने उपयुक्त
* आशयसघनता आहे.
* वाक्यरचना वयानुरूप योग्य
* शब्द बहुतांशी सुपरिचित आहेत
* विद्यार्थ्यांच्या अनुभवविश्वाशी जवळीक साधणाऱ्या अध्ययन-अनुभूतीचा वापर केलेला आहे.
* माहिती, ज्ञान यांमध्ये विविधता आढळते.
* वैचारिक निबंध, गोष्ट, उतारा, नाट्यीकरण, कथा, प्रसंगवर्णन, शब्दचित्र,इ. विविध माध्यमांचा आशयानुरूप वापर केलेला दिसतो.
* बरेचसे धडे व कविता विद्यार्थ्यांच्या व्यक्तिमत्त्व विकासाला हातभार लावणारे आहेत.
* झपाट्याने बदलणाऱ्या परिस्थितीला सामोरे जाण्यासाठी विद्यार्थ्यांचा दृष्टिकोन तयार करण्यास मदत करणारे स्वयंअध्ययनास पूरक, पोषक.
* सामाजिक दृष्टिकोन तयार करण्यास मदत होईल, अशी स्वाध्याय-रचना
* चित्रांचा आवश्यक त्या ठिकाणी व उपयुक्त असा वापर
* बहुतांश कवितांमध्ये गेयता

* व्याकरणाबाबत समर्पक विचारप्रणाली
* मनोरंजकतेचा प्रयत्न

१ ते ५ इयत्तांच्या मराठीच्या पाठ्यपुस्तकाच्या या जमेच्या बाजू लक्षात घेता पाठ्यपुस्तकांचा दर्जा उंचावलेला आहे व ती अद्ययावत करण्याचा प्रयत्न स्तुत्य आहे. शिक्षक, पालक, विद्यार्थी यांचे वर उद्‌धृत कलेले अभिप्राय लक्षात घेता ६०% पर्यंत आपण येऊन पोहोचलो, असे म्हणता येईल; परंतु उरलेल्या ४० टक्केवारीचे काय? असा प्रश्नही भेडसावल्याशिवाय राहत नाही. उरलेल्या या ४० टक्क्यांमधील काही त्रुटी आपल्याला निश्चितच दूर करता येण्यासारख्या आहेत. नमुन्यादाखल काही गोष्टींचा मी उल्लेख करणार आहे.

**सुधारणेसाठी लक्षणीय बाबी**

**इ. १ली :**

उ - उखळ
ए - एडका
ख - खटारा

यांची चित्रे दिली असली, तरी विद्यार्थ्यांना याचा प्रत्यक्ष अनुभव येणे कठीण आहे, असे कालबाह्य शब्द टाळता येतील का? त्याठिकाणी परिचित शब्दांचा वापर केल्यास, अवघड लेखन व अपरिचित शब्द यांमुळे विद्यार्थ्यांची द्विधा मन:स्थिती होणार नाही.

* आकार, इकार, ईकार यांवर आधारित दृढीकरणासाठी शब्दसंख्या वाढवता येईल.
* पाठ वैचारिक दृष्टिकोन तयार करणारे; परंतु कृतीची संधी देणारे नाहीत.

१ लीत प्रवेश करणारे हे पाच वर्षांचे मूल अतिशय निरागस, संवेदनशील, भावनाशील, अनुकरणप्रिय, तसेच सतत काही तरी करायला बघणारं आहे. त्याच्या या मनोवृत्तीचा विचार करून हलके फुलके लेखन होण्याची आवश्यकता आहे. त्यासाठी बालमानसशास्त्रावर आधारित पाठलेखन व्हायला हवे आहे. मला वाटतं, त्यासाठी लेखकाला बालक व्हायला हवं.

माझ्या लहानपणचा 'पेरूची फोड' हा धडा आजही जसान् तसा लक्षात आहे. त्यातून मनावर झालेला संस्कार आजही कृतिप्रवण करतो.

* अर्थपूर्णता हा तर या पाठ्यपुस्तकातील पाठांचा स्थायिभाव व्हावा. २ऱ्या धड्यातील 'कच, वचक, बचक, चकव' हे शब्द या मुलांच्या वयाचा विचार करता अर्थपूर्ण वाटत नाहीत. त्यामुळे प्रत्यक्ष वस्तू मुलांच्या डोळ्यांसमोर उभी राहत नाही. या वयात वास्तविक मूर्ताकडून अमूर्ताकडे हे सूत्र वापरणे अत्यावश्यक वाटते.

* चाचा नेहरू या धड्यात नेहरूंचे वर्णन करताना 'दिसायला सुंदर' हे शब्द विद्यार्थ्याला कळत नाहीत. कारण सुंदरतेची कल्पनाच त्यांच्या मनात रुजलेली नसते. अशी संदिग्धता टाळता येईल..

## इयत्ता २री

* 'पवनचक्की' हा धडा कल्पनातीत वाटतो. कारण याचे प्रत्यक्ष कार्य बघितल्याशिवाय ही संकल्पना स्पष्ट होणे कठीणच. यामुळे मुलगा आपल्या कल्पनाशक्तीचा वापर करून अर्थ शोधण्यात गुंततो व त्यामुळे आशयाचा अपेक्षित परिणाम साधत नाही. त्यापेक्षा त्याला दैनंदिन जीवनात अनुभवास येणाऱ्या उपकरणांबाबत माहिती दिल्यास कुतूहलपूर्तीचा आनंद त्याला मिळेल.
* पाठ वाचताना मुलांची जिज्ञासा वाढावी. ती न वाढल्यास मुले त्यात रमत नाहीत. म्हणूनच असे दिसते, की पवनचक्की, मुक्तागिरी चाहूल, एक धरण या पाठांत मुलांना व्हावा तेवढा आनंद मिळत नाही.
* ६ वर्षांच्या मुलांना कविता म्हणायला खूप आवडतात. हावभावांसह, हातवारे करत, मोठ्या आवाजात कविता म्हणणे हा त्यांचा छंद असतो. या वयात पाठ केलेल्या कविता माणूस आयुष्यभर विसरत नाही. म्हणूनच आपण म्हणतो, 'प्रौढत्वी निज शैशवास जपणे बाणा कवीचा असे.' पण याचा प्रत्यक्ष अनुभव कवितांतून विद्यार्थ्यांना मिळाला पाहिजे. कवितांतून कवीने बालकाचे शैशव कसे जपता येईल, याचा विचार करायला नको का? सूर, ताल, लय यांचे जबरदस्त आकर्षण मुलाला या वयात असते.

पुस्तकातली 'नसती उठाठेव' ही कविता तशी वाटत नाही, तर एक गोष्ट पद्यात रचल्यासारखी वाटते. ती चालीवर कशी म्हणावी?

## इयत्ता ३री

* लेखनात सातत्य हवे. फुलाच्या पाकळ्या जितक्या सहजतेने नकळत उमलतात आणि कळीचे फूल केव्हा झाले, हे न कळावे, तितक्याच सहजतेने एका मुद्द्यातून दुसरा मुद्दा निघावा. पाठ सुरू झाला आणि वाचता वाचता केव्हा शेवट आला, हेही कळू नये, इतकी तन्मयता मुलाची व्हावी, असे वाटते म्हणूनच लेखनात सातत्य हवे. सलगता हवी.
* 'संत कबीर' या धड्यात जास्तीत जास्त माहिती देणाऱ्या आवेगात विस्कळीतपणा आला आहे. तुकडे जोडून वस्त्र विणल्यासारखे वाटते. मधेच वैयक्तिक माहिती, तर मधेच उपदेश, पुन्हा वैयक्तिक माहिती, मधेच प्रसंग, त्यामुळे ओघ खंडित होतो. मुले विचारांची साखळी गुंफत असतात. ती





अनुक्रमणिका

तुटला, तर पुन्हा त्याना जोडायला अवघड जात. अशक्य होते आणि मग तो धडा मुलांना अवघड वाटतो. त्यासाठी अनेक रंगांच्या धाग्यांचा सुरेख गोफ कसा गुंफता येईल, याकडे लक्ष द्यायलाच हवे.

* 'जंगलातील एक संध्याकाळ' आणि 'काझीरंगाच्या जंगलात' हे जवळपासच्या विचारधारेतील पाठ! मुलांना कल्पनेनेच चित्र साकारावे लागते. दैनंदिन आयुष्यातील मिळत्याजुळत्या प्रसंगांमध्ये ते समरस होतात. प्रत्येक गोष्टीचा अनुभव घेण्याची फार मोठी हौस त्यांना असते आणि असे या दोन धड्यांप्रमाणेच 'देवाघरचे नाते' या पाठातही रमत नाहीत. धाडस, साहस, उत्सुकता ताणणारे प्रसंग या वयात जास्त आवडतात, म्हणूनच मुलासारखे मूल होऊनच त्यासाठी लिहायला हवे.

**इयत्ता ४थी**

* प्रमाण भाषेचा वापर फारसा करावा, की नाही, हा वादाचा मुद्दा! पण आता शिक्षणाचे सार्वत्रिकीकरण होत असल्यामुळे भाषेतील अशुद्धता या नव्या पिढीत तरी कमी दिसू लागली आहे. कदाचित मराठी भाषेच्या लिखाणातील अशुद्धता कमी व्हायला वेळ लागेल; पण बोलण्यातील अशुद्धता नक्कीच कमी झाल्याचे दिसते. याचे कारण प्रसार माध्यमांचा प्रभाव! रेडिओ, टीव्ही, वर्तमानपत्रे, मासिके, पुस्तके, इ. विविध माध्यमांच्या उपयोगितेमुळे शुद्ध भाषा मुलाच्या कानांवर वारंवार पडते. तसे बोलण्याचे, उच्चाराचे अनुकरण करण्याकडे मुलाचा कल असताना पाठात अशुद्ध भाषा का वापरली? ग्रामीण भागातील माणूस म्हणजे अशुद्ध भाषाच बोलणार, हा संकेत आम्ही कालानुरूप मोडायला नको का? ग्रामीण भागातील वैशिष्ट्यपूर्ण शब्दांचा जरूर वापर व्हावा; पण वाक्यरचना अशुद्ध नको. 'झेल्या' हा पाठ परिणामकारक पण ग्रामीण बोलीभाषेत लिहिल्यामुळे शहरी मुलांना शब्द अपरिचित वाटतात. म्हणून आशय परिणामकारक असूनही रुचत नाही.
* अनावश्यक पुनरावृत्ती, उल्लेख सहज टाळता येण्यासारखे आहेत. उदा., 'उजेड पडला' पाठ. जातिभेद करण्यास मनाई म्हटल्यावर पुन्हा त्याची पुनरावृत्ती कशाला? कारण या पिढीला त्याचा स्पर्शही नाही, तर मग त्या विचारांच्या दिशेला त्यांना वळवणे टाळता येणार नाही का? कालानुरूप बदल केला, तरच प्रगती अधिक वेगाने होईल.
* काही संकल्पना स्पष्ट करणे शिक्षकांनाही कठीण जाते. उदा., याच धड्यातील 'कुळवाड्यातील मुले' अशा संकल्पना टाळाव्या किंवा सोप्या कराव्यात. त्याचप्रमाणे 'देवी अहल्याबाई होळकर' या पाठात सती जाणे, विधवा होणे, इ. उल्लेख टाळता येतील का? कारण या पिढीच्या कल्पनेच्या बाहेरच्या या

गोष्टी आहेत.

* काही पाठांत मुलांना क्लिष्टता जाणवते. उदा., 'एक भारतीय संशोधक' हा माहिती देणारा पाठ. या वयात मुले काही तरी विशेष कामाने भारावण्यासाठी उत्सुक असतात. आपण कुणासारखे तरी व्हावे, म्हणून कुणाशी तरी साम्य शोधत असतात. तसे अशा माहितीप्रद पाठात त्यांच्या हाती काहीच गवसत नाही.
* 'सिंधुदुर्ग' पाठात नावीन्य वाटत नाही. कारण इतिहासामध्येही हा पाठ आहेच, आणि तिथेच तो योग्य आहे.
* काही कविता त्यामधील अनोळखी शब्दांमुळे क्लिष्ट वाटतात. उदा. दीपत्कार, लपंडाव, क्ठीण समय येता, इ. 'कठीण समय येता' मधील प्रत्येक शब्द क्लिष्ट. उदा., उपानह, भूप, नृप, पंचू, तदितर, भेणे, उपवनजलकेली, इ.
* वयानुरूप कविता असल्यास ती अर्थवाही होते. कल्पनातीत उपमांनी विद्यार्थी संभ्रमात पडतो. उदा., दीपत्कार कवितेत ही कल्पना पाहा – सूर्य उगवल्यानंतर पडणाऱ्या प्रकाशाच्या किरणांमुळे परसातील कुंड्यांतील उमलणारी फुले जणू काही दिव्यांप्रमाणे दिसतात. त्यामुळे दिवेलागणी झाली, असे वाटून शुभंकरोति म्हणावे, असे वाटणारी कल्पना.

**इयत्ता ५वी**

५वीचे मराठीचे पाठ्यपुस्तक अभ्यासताना विद्यार्थ्यांना काय वाटले? काय आवडले? काय खटकले? हे निरखण्यासाठी प्रामुख्याने मी विद्यार्थ्यांच्या अभिप्रायांचा विचार केला. कारण या वयातली मुले मनात येईल ते बोलून दाखवितात, कुणाला त्यामुळे काय वाटेल, याकडे फारसे लक्ष देत नाहीत, म्हणून मी त्यांच्याशी अधिक जवळीक साधली. प्रामुख्याने या वयोगटातील मुलांना जे समजते, उमजते, ते सर्व ते लिहू शकतात. त्यांचे लिखित अभिप्राय बोलके आहेत.

* 'आईस पत्र', 'जबाबदारी' हे पाठ विशेष रुचले नाहीत. नेहमीचाच उपदेश, म्हणून त्यांना हे कंटाळवाणे वाटते. 'जबाबदारी' पाठातील वाक्यरचना बोजड वाटते. त्याच कारणामुळे 'भामरागड' पाठही त्यांना कंटाळवाणा वाटतो. पाठावरील प्रश्नांची उत्तरे लिहिण्यापुरते ते लक्ष केंद्रित करतात; पण मनावर संस्कार होऊ द्यायला तयार नसतात.
* या वयात तुलनात्मक दृष्टिकोन तयार झालेला असतो; म्हणूनच 'नवरोज' पाठ वाचल्यावर ते इतर धर्मातील सणांचा उल्लेख का नाही, म्हणून तक्रार करतात.
* 'हुतात्मा भाई कोतवाल' आशय आवडतो; पण वाक्यरचना अवघड असल्याने रसहानी होते.
* 'दादू' शब्दचित्र पसंत पडते; पण चांगले-वाईट समजण्याइतकी समजशक्ती आल्यामुळे 'यात बीअर हा घाणेरडा शब्द कशाला आला?' असा ते सूर

धरतात आणि पुढे त्याचे स्पष्टीकरणही देतात, की आम्ही लहान असल्यामुळे आमच्या मनावर त्याचा वाईट परिणाम होतो. या ठिकाणी खरोखरच प्रचीती येते, ती या वाक्याची, की शब्द शस्त्र आहे, जपून वापरा!'

* कल्पनाशक्तीच्या बाहेरची वाक्ये आली, की मुले गोंधळतात. त्यांना त्याचा अर्थ गवसत नाही, म्हणून ती अस्वस्थ होतात. उदा., 'आईस पत्र' धड्यात "हा दुरावा, हा तिऱ्हाईतपणा, हा परकेपणा नात्यांच्या संबंधांना छेद करणारा आहे." किंवा 'दादू' या पाठात

  'दादू, कुठं चाललास?"

  'तुमच्या आईसाहेबांकडं!'

  'कशाला?'

  'त्यांच्या झाडाला कीड लागलीय्, हे सांगायला!'

  हा सुसंवाद विसंवाद होण्याची शक्यता टाळता येणार नाही का? 'माझ्या पाठच्या बहिणी' पाठात,

  'घरी निघाली पाहुणी, टाळते मी तुझी दृष्टी
  वाटे, अवेळीच वृष्टी, होईल की!'

* प्रत्येक पाठातून थोड्या-फार फरकाने एकच संस्कार व्हावा, हे नक्कीच उद्दिष्ट असते. परंतु विद्यार्थ्यांचे अभिप्राय बघता या संस्कारात भिन्नता जाणवते. उदा., 'जिद्द हीच दौलत' या पाठातून झालेल्या संस्कारातील भिन्नता–

  'प्रत्येक माणसात जिद्द हवी'

  'जयदेवचा आळशीपणा कसा संपतो?'

  'मुलांवर पालक कसे चिडतात, इच्छेप्रमाणे वागू देत नाहीत, जबरदस्ती करतात.'

  'स्वातंत्र्यलढ्याची माहिती'

  'शक्य नसते, ते शक्य करून घेणे'

  'धनापेक्षा जिद्द हीच माणसाची खरी दौलत आहे'

  **किंवा**

  'गोट्या' या पाठातून झालेले विविध संस्कार

  'घरच्या परिस्थितीची आकर्षक मांडणी व गोट्यावरची माया'

  'गोट्याचा भोळेपणा, आज्ञाधारकपणा, कौटुंबिक जीवन'

  'विनोदी प्रसंग म्हणून मजेशीर'

  'निराधार लोकांना मदत केल्याने परिवर्तन होते'

  'गोट्याच्या काकाचा स्वभाव चांगला नव्हता. त्याने पुतण्याला शिक्षणाच्या ऐवजी हॉटेलात कामाला लावले.'

यासाठी प्रत्येक पाठाचे उद्दिष्ट कोणते, ते शिक्षक हस्तपुस्तिकेत अधिक सुस्पष्टपणे मांडणे जरुरीचे वाटते. म्हणजे विद्यार्थी आपल्याला जसे भावेल, तसा त्यातून अर्थबोध करून घेणार नाहीत.

* या वयातल्या मुलांना थोडेसे परंतु मनोवेधक, आकर्षक हवे असते. म्हणूनच 'राधिका' पाठ त्यांना आपल्यासाठी वाटत नाही.

  'माझ्या पाठच्या बहिणी' ही लांबलेली कविता आवडत नाही.
* काही कल्पनांच्या आस्वाद घेता येत नाही. अर्थबोधात गफलत झाल्यामुळे त्यांना ते रुक्ष वाटते. उदा., 'ऋतुचक्र' पाठातील वाक्य, 'आंब्याची झाडे पिवळट पांढऱ्या मोहोराने झाकलेली असतात. त्यातून मध झिरपत असतो आणि त्याचा तिखट, जड, गोड गंध रानोमाळ दाटून राहतो.' विद्यार्थ्यांच्या हे आकलनशक्तीच्या बाहेरचे वाटते. अनावश्यक विशेषणे टाळता येणार नाहीत काय?

### आपल्याला काय करता येईल?

पाठ्यपुस्तकाचे ओझे तर विद्यार्थ्याला आपल्या पाठीवर वहायला लागू नयेच; पण त्याहीपेक्षा भयावह गोष्ट म्हणजे, आमच्या या चिमण्या जीवांना ज्ञानाचे ओझे होऊ नये. मराठी भाषा ही तर खरी त्यांची मातृभाषा! मातेइतकीच जवळची असणारी! आई जेवढा मुलाचा विकास जीव तोडून, तळमळीने, कळकळीने, तन्मयतेने, आपले सर्वस्व पणाला लावून करते, तीच भूमिका आमच्या मराठीच्या पाठ्यपुस्तकाला आमच्या विद्यार्थ्यांबाबत साकारता येणार नाही का? निश्चितच येईल! मात्र त्यासाठी आपल्याला काही पथ्ये पाळावी लागतील.

* बालकाला केंद्रस्थानी मानावे.
* पाठातील आशय त्याचे मानसिक वय, वैचारिक पातळी लक्षात घेऊन निवडावा.
* 'थोडेसे; परंतु पूर्ण समजलेले हे पुष्कळ, पण थोडेसेच समजण्यापेक्षा बरे!' हे प्रा. यशपाल यांचे मनोगत लक्षात घेऊन पाठात माहिती कोंबलेली नसावी. अनावश्यक माहिती, पुनरावृत्ती टाळावी.
* अध्ययन-अनुभवांची निवड ही शिक्षणार्थीच्या अनुभवविश्वाच्या जवळपासची असावी.
* आशय स्वयंअध्ययन, नवनिर्मितिक्षमता, कौशल्यप्राप्तीस पूरक, पोषक असावा.
* पाठ्यपुस्तके केवळ माहिती आणि घटना सांगण्यासाठीच लिहिण्यापेक्षा मुलांना विचारप्रवण, शोधप्रवण होण्याच्या दृष्टीने प्रेरक व्हावीत.
* अकारण भाषाशैलीच्या मागे न लागता मुलांना पाठ्यपुस्तकात लिहिलेली भाषा आपली स्वतःची वाटावी.

* कृत्रिम, शब्दच्छलात्मक भाषेचे वर्चस्व नसावे. कारण त्यामुळे ज्ञानापासून जीवनाची फारकत होते.
* भाषा हे संप्रेषणाचे (Communication) प्रभावी साधन असल्यामुळे भाषेचा संप्रेषणाच्या विविध अंगांनी विकास व्हावा, हे तत्त्व लक्षात घेऊन लेखनपद्धती ठेवावी.
* भाषेच्या पाठ्यपुस्तकाचा मनोरंजनातून शिक्षण हा स्थायिभाव असावा.

प्राथमिक स्तरावरील १ ते ५ इयत्तांची मराठीची पुस्तके अभ्यासल्यानंतर या इयत्तांमध्ये अध्ययन करणाऱ्या मुलांना हवे तरी काय? याचाही मागोवा घेण्याचा या निमित्ताने प्रयत्न केला. पुढील तक्त्याद्वारे ते एका दृष्टिक्षेपात आपल्याला जाणून घेता येईल.

| **गद्य** | **इयत्ता** | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | **१ली** | **२री** | **३री** | **४थी** | **५वी** |
| विचारप्रवर्तक लेख | | | | | - |
| भावनोत्कट कथा | ५ | १२ | १० | १२ | १४ |
| प्रसंगवर्णने | | | ४ | ५ | २१ |
| शब्दचित्र | | - | ५ | ७ | ११ |
| गोष्ट | ५० | ३७ | ३५ | २० | १० |
| उपदेशपर पाठ | | | | | |
| माहितीपर पाठ | | - | | १० | १८ |
| विनोदनिर्मिती | - | | ११ | २३ | १० |
| स्वप्नरंजन | ४० | ३८ | २५ | १७ | १५ |
| फजिती, गंमत | ५ | १३ | १० | ६ | |
| | १०० | १०० | १०० | १०० | १०० |

| **पद्य** | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| नाद, ताल, लयबद्ध | २५ | ३१ | ३० | ३७ | ५० |
| हावभाव, हालचालीस वाव | २५ | २० | २० | १३ | १५ |
| अनुभवशीलता आणि | २५ | २९ | २७ | ३३ | १७ |
| म्हणावयास सोपी | २५ | २० | २३ | १७ | १८ |
| | १०० | १०० | १०० | १०० | १०० |

पाठ्यपुस्तकातील गद्य तसेच पद्य पाठ लिहिताना या वयोगटातील मुलांच्या अभिरुचीचा विचार आपल्याला करता येणार नाही का? तसा तो केल्यास आणि त्यानुसार पाठ्यपुस्तकातील आशय मांडल्यास आमची पाठ्यपुस्तके नक्कीच प्रभावी,



अनुक्रमणिका

परिणामकारक आणि उपयुक्त ठरतील.

**प्रामुख्याने**

* पाठ्यपुस्तकातील पाठांचे लेखन इतर विषयांतील पाठांचे लेखन आवर्जून केले जाते, त्याप्रमाणेच त्या इयत्तेतील विद्यार्थ्याला नजरेसमोर ठेवून केले जावे. कोणत्याही पुस्तकातून लेख घ्यावयाचा असल्यास विद्यार्थ्याच्या क्षमता आणि गरजा लक्षात घेऊन पुनर्लेखन करावे.
* गतकाळाबरोबरच वर्तमानकाळ व भविष्यकाळाचा वेध घेऊन भाषाविकासातून व्यक्तिमत्त्व-विकास घडून येण्याच्या दृष्टिकोनातून लेखन व्हावे.
* शब्दसंपत्ती समृद्ध करण्याच्या दृष्टीने, तसेच, अनुरूप शब्दांचा वापर व्हावा, यासाठी यासंदर्भात अद्ययावत झालेली शब्दसंपत्ती संशोधन अहवाल पाठलेखकांना उपलब्ध करून द्यावेत. त्यांचा वापर करण्याचा आग्रह धरावा.
* पाठ्यपुस्तकातील पाठांना अंतिम स्वरूप देण्यापूर्वी किमान एक वर्षभर आधी शहरी व ग्रामीण भागात प्रातिनिधिक स्वरूपाच्या शाळांतू वर्षभर त्या त्या इयत्तांना वापरून पाहावीत. आशय, उपलब्ध वेळ, उपयुक्तता, इ. बाबत वर्षभरात शिक्षकांना अध्यापन करताना नोंदी ठेवण्यास सांगावे. वर्षाअ-खेरीस नोंदींवरून त्यातल्या उणिवा शोधून काढून त्या दूर कराव्यात आणि मगच पाठ्यपुस्तकाला अंतिम स्वरूप द्यावे. अशा प्रकारे (Try Out) घेताना त्याला संशोधनात्मक स्वरूप द्यावे, म्हणजे त्यात शास्त्रशुद्धता येईल.
* संशोधनकार्यात सुजाण बालक, पालक व शिक्षक यांच्या अभिप्रायांना प्राधान्य द्यावे.
* पाठ्यपुस्तके बालकांशी हितगूज करतील, इतकी ती सजीव व चैतन्यमय व्हावीत, मुलांना ती आपली संपत्ती वाटावी, त्यांचा तो अमोल ठेवा ठरावा, ही अंतिम सदिच्छा!

*(२मे, १९९४ रोजी मराठी अभ्यास परिषद, पुणे आणि महाराष्ट्र राज्य मराठी विकास परिषद यांच्या विद्यमाने 'मराठीची पाठ्यपुस्तके' या विषयावर आयोजित केलेल्या चर्चासत्रात वाचला गेलेला निबंध)*

**आदर्श बहुव्यापी शिक्षण व संशोधन महाविद्यालय, कर्वे रोड, पुणे ४, फो.नं. (Off.) ३३३०८४ (Res.) ३६९३७९**

❍❍

# बालभारती / कुमारभारती : एक अवलोकन

-विनया खडपेकर

महाराष्ट्रातील विद्यार्थिवर्गाची पार्श्वभूमी अनेक प्रकारे भिन्न आहे. त्यात मराठवाडा, विदर्भ, पश्चिम महाराष्ट्र अशी प्रादेशिक भिन्नता आहे. त्याचप्रमाणे नागर-ग्रामीण हा भेद आहे. शिवाय निरनिराळ्या जातीजमातींमधील भिन्नता आहे. निरनिराळ्या संस्कृतींची पार्श्वभूमी असणाऱ्या, विविध स्तरांतील सर्व विद्यार्थ्यांना रुचतील, पचतील आणि त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास साधतील, अशी पाठ्यपुस्तके देणे हे एक कठीण आव्हान आहे.

इयत्ता पहिली ते इयत्ता दहावीपर्यंतच्या मराठी विषयाच्या बालभारती/ कुमारभारतीचे वाचन केले असता, असे म्हणावेसे वाटते, की गद्यपद्याच्या विषय-निवडीबाबत मालिकेने हे आव्हान समर्थपणे पेलले आहे. पहिल्या इयत्तेत अक्षर-ओळख झाल्यानंतर मुलांचे सामान्य ज्ञान वाढविणे आणि त्यांचे व्यक्तिमत्त्व सर्व बाजूंनी विकसित होण्यासाठी पाया तयार करणे हा गद्य-पद्य विषय-निवडीचा हेतू पाठ्यपुस्तकांमधून स्पष्ट दिसून येतो.

पाठ्यपुस्तक निर्मितीची यंत्रणा लक्षात घेतली असता समजते, की १९८६ च्या राष्ट्रीय शैक्षणिक धोरणानुसार दहा गाभा-घटकांच्या आधारे १९८८ मधे अभ्यासक्रम तयार झाला.

**दहा गाभा घटक**

१) भारतीय संविधानात्मक जबाबदाऱ्या
२) राष्ट्रीय अस्मिता जोपासण्यासाठी आवश्यक आशय
३) भारताचा समाईक सांस्कृतिक वारसा
४) समानतावाद, लोकशाही व धर्मनिरपेक्षता
५) स्त्री-पुरुष समानता
६) पर्यावरणाचे संरक्षण
७) सामाजिक अडसरांचे निर्मूलन
८) लहान कुटुंबाचा आदर्श
९) भारतीय स्वातंत्र्य-चळवळीचा इतिहास

१०) वैज्ञानिक मनोभावाची रुजवणूक

या अभ्यासक्रमाप्रमाणे मातृभाषेच्या अभ्यासासाठी काही मार्गदर्शक तत्त्वे आखण्यात आली. या मार्गदर्शक तत्त्वांनुसार 'बालभारतींची (इ.१ली ते ७वी) निर्मिती झाली. महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाने आठवी ते दहावीच्या अभ्यासक्रमाचा विचार करून सर्व विद्यार्थ्यांसाठी काही उद्दिष्टे योजली. त्यांनुसार आठवी, नववी, दहावीच्या 'कुमारभारती'ची निर्मिती अनुक्रमे १९८२, १९८३, १९८४ मधे झाली. बालभारतीची मार्गदर्शक तत्त्वे आणि कुमारभारतीची उद्दिष्टे यांत कोणताही मूलभूत फरक नाही. दोन्ही मालिकांचे प्रयोजन एकच आहे.

मार्गदर्शक तत्त्वांमुळे महाराष्ट्रातील सर्व विद्यार्थ्यांच्या मातृभाषा शिक्षणासाठी एक समान भूमी मिळून पाठ्यपुस्तक निर्मितीचे कार्य काहीसे सुलभ झालेले आढळते. या पाठ्यपुस्तकांतून निसर्गाचे सौंदर्य उलगडत, त्याची मानवी जीवनातली आवश्यकता सांगत, झाडे-फुले, पशु-पक्षी यांच्याशी मित्रत्वाचे नाते रुजविण्याचा प्रयत्न केला आहे. (उदा., इ.१ली 'चूक कळली', इ.५वी 'सुंदर हिरवे माळ' (कविता)-गिरीश., इ.८वी 'भारताचा स्वर्ग'-श्री.प्र.के.अत्रे, इ.१०वी, 'चिमण्या'-ग्रेस) ग्रामीण जीवनाचा परिचय करून दिला आहे. (उदा. इ.१ली 'लेझीम', इ.४थी 'उजेड पडला'-भीमराव गस्ती, इ.७वी 'अंगणवाडी'-अनुताई वाघ, इ. ९वी 'शाळा'-वि.शं. पारगावकर) प्राचीन आणि ऐतिहासिक काळातील कथा/ काव्याद्वारे परंपरेचा वारसा संगितला आहे. (उदा. इ. २री शिष्याची परीक्षा-व.द. देसाई., इ. ५वी 'मित्रप्रेम', इ.८वी तुकाराम, रामदास, वामन पंडित, इ.इ.१०वी 'आपेश मरणाहुन वोखटे') राष्ट्रभक्ती जोपासली जावी, याची काळजी घेतली आहे. (उदा. इ.२री जयहिंद : एक घोष-मधुकर आष्टीकर, इ.५वी 'हुतात्मा भाई कोतवाल'-शशिकांत चव्हाण, इ.८वी 'गे माय भू'-सुरेश भट, इ.१०वी क्रांतीचा जयजयकार-कुसुमाग्रज) मुले विज्ञानाभिमुख कशी होतील, याचा विचार केला आहे. (उदा. इ.२री 'एक धरण', इ.५वी विज्ञानयुगाची नांदी (कविता)-राजेंद्र अत्रे, इ.८वी 'आणि बुद्ध हसला'-यदुनाथ थत्ते, इ.९वी जॉन ग्रेगर मेंडल-अ.ब. सप्रे) राष्ट्राच्या घडणीत सहभागी होणाऱ्या व्यक्तींची आत्मकथने / चरित्रे देऊन त्यांच्याविषयी आदर निर्माण केला आहे. (उदा. इ.२री 'म. फुले'-मा.ल. मुळे, इ.४थी पं.नेहरूंच्या पत्रातून-पं. नेहरू, इ.६वी 'माझा विरंगुळा'-यशवंतराव चव्हाण, इ.९वी 'सेनापती बापट'-पु.ल. देशपांडे) स्त्री-पुरुष समानतेचा विचार सूचित करून पूर्वीच्या दुय्यम स्थानाकडे आणि स्त्री- जीवनाच्या कष्टमय बाजूकडे लक्ष वेधले आहे (उदा. इ.४थी 'सोनुताई (कविता), इ.५वी 'झपझप चाललेत नाजुक पाय (कविता)-दत्ता हलसगीकर, इ.१०वी 'जोखड'-रजिया पटेल) समाजकार्यकर्त्यांचा परिचय देऊन त्यांच्या कार्याबद्दल आस्था निर्माण केली आहे. (उदा. इ.५वी 'भामरागड-अनिल थत्ते, इ. ६वी साने-गुरुजी राजा मंगळवेढेकर, इ.८वी सावित्रीबाई फुले,-बाबा आढाव) साहसाची ओढ निर्माण करण्याचा प्रयत्न आहे. (उदा. इ.२री 'ताराबाईची सर्कस'-रमेश मुधोळकर, इ.५वी

भाजेच पाहिजे-कृ.भा. बाबर, इ. ७ वी रुस्तुम-ए-हिंद-बाबा आमटे) भाषाविषयी काही मूलभूत विचार करण्यास मुलांना उद्युक्त केले आहे (उदा. इ.७वी 'अशी वाढते भाषा'- श्री.म. गाटे, इ.९वी 'स्वभाषेस प्रौढी कशी येईल ?-गो. ना. माडगावकर, इ. १० वी 'मातृभाषेतून शिक्षण द्यावे' यशवंतराव चव्हाण)

इयत्ता पहिली ते दहावी बालभारती/कुमारभारतीचे स्वरूप स्थूलमानाने असे आहे. आता थोडे अधिक खोलात जाऊन या पाठ्यपुस्तकाकडे पाहू आणि त्यांचे गुणावगुण तपासू.

**गद्य**

मार्गदर्शक तत्त्वे डोळयांसमोर ठेवून काही उत्तम पाठ पाठ्यपुस्तकांमध्ये आलेले आहेत. इयत्ता दुसरीतील 'बैल झपाटला' (रा. शं. शिंदे) हा पाठ अंधश्रद्धेवर आघात करून वस्तुस्थितीचे दर्शन सहजपणे घडवतो. इयत्ता पाचवीच्या 'राधिका' (दि.व्यं. जहागिरदार) या पाठात संगणकाची ताकद आणि मर्यादा अत्यंत मनोरंजक कथेच्या माध्यमातून दाखवल्या आहेत. इ. सातवीच्याय पाठातील 'बहाद्दर चिमण्या' (आनंद यादव) मुक्या प्राणिसृष्टीतील निराळाच खेळ दाखवितात. इ. नववीतील 'सत्याग्रह म्हणजे काय (म.गांधी), 'जर मरायचेच असेल, तर देशासाठी' (वि.दा. सावरकर) 'भारतात लोकशाही नांदो' (डॉ. बाबासाहेब आंबेडकर) हे लेख निरनिराळया विचारप्रणालींच्या मुळाशी मुलांना घेऊन जातात. अशी आणखीही उदाहरणे देता येतील.

मार्गदर्शक तत्त्वांचा डोळा चुकवूनही दोन प्रशंसनीय प्रवाह पाठ्यपुस्तकांत शिरले आहेत. इयत्ता पहिलीपासूनच अनेक विनोदी पाठांतून खेळकर वृत्ती जागरूक करण्याचा प्रयत्न केला आहे (इ.१ली 'फजिती, इ. ५वी 'माझे गाणे', श्री. कृ. कोल्हटकर, इ.९वी 'स्वयंपाकीण काकू' चिं.वि.जोशी) दुसरे म्हणजे राजांच्या अनेक कथांतून सत्तेच्या राजकारणाच्या भल्याबुऱ्या बाजू दाखविल्या आहेत. (इ.३री 'दहा पैशांचा पंखा', इ.५वी 'हृदयाची श्रीमंती' इ.९वी, 'राजाचे शील') कोणत्याच तत्त्वांचे ओझे नसलेले इतरही काही उत्कृष्ट लेख आहेत. इयत्ता सहावीतील 'मैफल' (विजय तेंडुलकर) हा पाठ कलेच्या धुंदीचे चित्र उभे करतो आणि 'महापूर' (पु.भा.भावे) उद्ध्वस्ततेचे चित्रण करतो. सातवीतील 'आगळा पाहुणचार' आणि आठवीतील 'लंडनचा नाताळ' हे पु.ल.देशपांडे यांचे लेख खुसखुशीत आणि माहितीपूर्ण आहेत.

मार्गदर्शक तत्त्वांनुसार आलेले अनेक पाठ कधी भोळेभाबडे, आशयहीन आहेत, तर कधी नि:सत्त्व, पोकळ आहेत. इ. चौथीतील 'प्राण वाचवले' ही कथा अशी भाबडी आहे.

गावात चोरी करायला आलेले गुंड फारच सहजपणे फसतात. दूरदर्शनवर (स्टार टीव्हीवर) नित्य गुन्हेगारीचे आणि गुंडगिरीचे चित्रण पाहणाऱ्या पिढीला या चित्रातली

चूक उमजेल आणि चित्र फोल वाटू शकेल. इ. सहावीतील 'बहिणीची माया' (ह.ना. आपटे) ही कथाही भोळीभाबडी आहे. घराबाहेर पडलेल्या लहान मुलांसाठी भोवताली सगळीकडे प्रेमळ माणसेच पसरली आहेत, अशी चुकीची धारणा यातून निर्माण होऊ शकेल. इयत्ता पाचवीमधला 'दादू' (वि.स. खांडेकर) याच प्रकारचा भोळसट, सुमार्गी माणूस आहे.

आदर्शवाद आणि भाबडेपणा यांतला फरक स्पष्ट करणे येथे आवश्यक आहे. इ. चौथीमधली 'न्याय' (मुन्शी प्रेमचंद) ही कथा वास्तववादी आहेच, असा दावा करता येणार नाही. परंतु ती आदर्शवादी जरूर आहे. तिच्यात स्वप्नाळू भाबडेपणा नाही. कारण या कथेतील पात्रांची सद्गुणी आणि दुर्गुणी अशा काळ्या–पांढऱ्या रंगात विभागणी झालेली नाही. सर्वच व्यक्तींच्या मनांतील विचार–विकार आणि प्रेम-सूड, मत्सर-लोभ, मोह-सदसद्विवेकबुद्धी या भावना सूक्ष्मतेने चित्रित झालेल्या आहेत.

काही लेख चांगले आहेत. परंतु वाक्यरचनेतला, वाक्यक्रमातला निष्काळजीपणा, माहितीबद्दलची बेफिकिरी यांमुळे त्यांना पाठ्यपुस्तकासाठी अपेक्षित असा दर्जा गाठता आलेला नाही. इयत्ता पहिलीमधला 'चाचा नेहरू' हा लहानसा लेख घ्या.

*"चाचा नेहरू पंतप्रधान झाले.*
*त्यांनी देशासाठी खूप काम केले.*
*धरणे बांधली, कारखाने काढले.*
*ते कोटावर गुलाबाचे फूल लावत."*

धरण आणि कारखाने बांधण्याच्या कर्तृत्वानंतर कोटावर गुलाबाच्या फुलाचे प्रयोजन काय? त्यांच्या रूपाचे वर्णन सुरुवातीच्या तीन वाक्यांत आले आहे. त्यानंतर गुलाबाचे फूल शोभून दिसले असते.

*"नेहरूंचा रंग गोरा, नाक सरळ.*
*सदा हसरे, दिसायला सुंदर."*

यानंतर ते कोटावर गुलाबाचे फूल लावत, हे वाक्य ओघात आले असते. या लहानशा लेखाची फेररचना करणे आवश्यक आहे. इयत्ता दुसरीतील 'मोर' या पाठात मोर आपला राष्ट्रीय पक्षी असल्याचे सांगितले आहे. परंतु राष्ट्रीय पक्षी म्हणजे काय, ते मात्र सांगितलेले नाही. उदाहरणार्थ, इतर पक्ष्यांच्या तुलनेत मोराची काही खास काळजी घेतली जाते का? इयत्ता तिसरीतील 'मित्र' (विजया वाड) या पाठातील काही मजकुरामुळे कथा भोंगळ वाटते. राजूला ताप आला, म्हणून डॉक्टरांकडे नेले असता डॉक्टरांनी दवाखान्यात दाखल करून त्याच्यावर शस्त्रक्रिया केली आणि शस्त्रक्रिया केल्याबरोबर तो कमरेखाली लुळा पडला, असे या कथेत म्हटले आहे. ताप आल्यावर शस्त्रक्रिया करणे का भाग पडले, शस्त्रक्रिया अयशस्वी का झाली, याचे दोन-तीन वाक्यांत स्पष्टीकरण आवश्यक होते. एरवी ही कथा डॉक्टरांबद्दल दूषित पूर्वग्रह निर्माण





अनुक्रमणिका

करू शकत. इयत्ता चौथीच्या 'एक भारतीय संशोधक' (ज.बा. कुलकर्णी) या लेखातील माहितीही काटेकोर नाही. शंकर आबाजी भिसे यांचा जन्मदिनांक २९ एप्रिल, १८६७ दिला आहे. नंतर लहानपणचा एक प्रसंग सांगून १८९८ मध्ये इंग्लंडच्या शास्त्रीय मासिकात जी स्पर्धा जाहीर झाली, तीत भिसे सर्वश्रेष्ठ ठरल्याचा उल्लेख आहे. मधल्या एकतीस वर्षांच्या काळाचा प्रवास अजिबातच आला नसल्यामुळे १८९८ मधला त्यांचा शोध हा एक चमत्कार वाटू शकतो. म्हणून अध्यापन पुस्तिका पाहिली असता अध्यापन पुस्तिका आणि पाठ्यपुस्तकातील मजकुरांत फरक आढळतो. अध्यापन पुस्तिका म्हणते,

'' 'साखर पीठ वगैरे जिन्नस गिऱ्हाईकास अथवा गृहिणीस आपोआप हवे तेवढे वजन करून देणारे यंत्र तयार करणाऱ्या कल्पक वैज्ञानिकास या स्पर्धेत भाग घेता येईल. वयाची, धर्माची, शिक्षणाची काहीही अट नाही,' ही जाहिरात भिसे यांच्या समोर आली. त्यांचे वय अवघ्या १५ वर्षांचे होते. स्पर्धेची मुदत फक्त १४ तासांवर आलेली होती. भिसे यांनी पूर्ण आत्मविश्वासाने यंत्राचे आराखडे पाठवले. त्यांना या यंत्राबद्दल बक्षीस मिळाले.''

याचा अर्थ ही घटना १८८२ मधे घडली, असा होतो. पाठ्यपुस्तकात १८९८ मधे घडल्याचा उल्लेख आहे. आणखी एक प्रश्न उरतो. स्पर्धेची मुदत जर चौदा तासांवर आली होती, तर १८८२ किंवा अगदी १८९८ मधे भिसे यांचे आराखडे चौदा तासांत भारतातून इंग्लंडला कसे काय पोहोचले? भिसे यांचा मृत्युदिनांक अध्यापन पुस्तिकेत आहे; पण पाठ्यपुस्तकात नाही.

इयत्ता नववीतील सुलोचना देशमुख यांचा 'मानवताधर्म' हा लेख अगदीच पोकळ आणि ढोबळ वाटतो. मानवताधर्माच्या गुंतागुंतीत, व्यामिश्रतेलां या लेखात स्पर्शच होत नाही. लेखिका म्हणते,

''आपले वर्तन मानवताधर्माला अनुसरून होते, की नाही हे आपण कसे ओळखायचे? खरे म्हणजे, हे ओळखणे फार सोपे आहे. ज्यांच्या संबंधात आपल्याला वर्तन करायचे आहे, त्याच्या जागी आपण आपल्याला समजायचे–मानायचे. त्याच्या जागी जर आपण असतो, तर या वर्तनाने आपले भले झाले असते काय? असा प्रश्न आपण आपल्या मनाला विचारायचा, याचे जर होकारार्थी उत्तर आले, तर ते वर्तन चांगले आहे, असे समजायचे. ते वर्तन मानवताधर्माला अनुसरून आहे, असे मानायचे.''

हे मानवताधर्माचे अगदी बाळबोध सुलभीकरण आहे. म. गांधी, सावरकर, आंबेडकर, विनोबा भावे यांच्या लेखांनंतर येणारा सुलोचना देशमुख यांचा लेख मानवताधर्माकडे पाहण्याचा कोणताही नवीन दृष्टिकोन देऊ शकत नाही. इयत्ता दहावीतील श्रीमती रजिया पटेल यांचा 'जोखड' हा उतारा संदर्भाअभावी एकांगी आणि पायाहीन वाटतो. नारीत्व शाप का ठरत आहे. लेखिका कोणत्या चक्रव्यूहात अडकली

आहे, याचे काहीच स्पष्टीकरण या उताऱ्यात न आल्यामुळे हा पाठ आशयहीन ठरतो.

काही पाठांत वाक्यरचना आणि शब्द चुकीचे आहेत. थोडी काळजी घेतली असती, तर हे दोष टळले असते.

उदा. १) इ.३री 'शूरवीर प्रीतिलता' (प्रकाश विनायक कामत)

ती पैशाने गरीब होती; पण देशभक्तीने श्रीमंत होती (पृ.२९) ही शब्दरचना, वाक्यरचना चुकीची आहे. 'ती पैशाच्या दृष्टीने दरिद्री असली, तरी तिचे दृदय देशभक्तीने श्रीमंत झाले होते,' अशा प्रकारचे वाक्य योग्य होईल.

२) इ.९वी 'सत्याग्रह म्हणजे काय?' (म.गांधी)

'सत्याग्रहात अत्याचार, लुटालूट, जाळपोळ यांना जागा नाही आणि, तथापि, सत्याग्रहाच्या नावाने आपण इमारती जाळल्या.' या ठिकाणी 'आणि' किंवा 'तथापि' यांतील एकच शब्द असणे योग्य आहे.

३) इ. ४थी तेनालीरामा

तेनालीरामा म्हणतो,

''माझ्या सासरच्या कुत्र्याला खंडोबा समजून मिठी मारली-'' (पृ.४२)

'सासरचा' हा शब्द चुकीचा आहे. पुरुषाच्या सासू-सासऱ्याच्या घराला सासुरवाडी म्हणतात.

४) इ.५वी जबाबदारी (भगिनी निवेदिता)

'विश्वासभंगासारखे पाप नाही. वचनभंगासारखा दोष नाही. (पृ. १३२)

'विश्वासभंग' म्हणण्याचा मराठीचा प्रघात नाही. विश्वासघात असा शब्द रूढ आहे.

**पद्य**

पद्य हा प्रकार गद्याच्या तुलनेत अधिक गुंतागुंतीचा आहे. कविता कशास म्हणावे, गीत कशास म्हणावे, कविता नादमय, तालबद्ध असलीच पाहिले किंवा तशी असण्याची आवश्यकता नाही, याबद्दल अनेक मतगतांतरे आहेत. यामुळे पाठ्यपुस्तकासाठी कविता निवडणे हे अधिकच जिकिरीचे काम आहे. पद्य विभागात इयत्ता दुसरी ते पाचवीच्या पुस्तकात कविता आणि गाणी असा भेद केला आहे आणि इयत्ता आठवी ते दहावीच्या पुस्तकात कविता आणि काव्यानंद असा भेद केला आहे. या भेदाचे निकष दिलेले नाहीत. कवितेला स्वाध्याय आहे. गाणी आणि काव्यानंदाला स्वाध्याय नाही. इयत्ता चौथीमधे ज्ञानेश्वरांचे पसायदान 'गाणी' विभागात समाविष्ट केलेले आहे.

मार्गदर्शक तत्त्वांची बांधिलकी पद्य विभागाशी विशेषकरून जाणवते. पद्यात निसर्गकवितांची रेलचेल आहे. राष्ट्रभक्तीने ओथंबलेल्या कविता आहेत. समतेचे स्वप्न उराशी बाळगणाऱ्या कविता आहेत. एकतेचा संदेश देणाऱ्या, श्रमांची महती

सांगणाऱ्या, वर्णजातिभेद मिटवू इच्छिणाऱ्या कविता आहेत. या सर्व कविता रचनेत निर्दोष आहेत. चुकीचे शब्दप्रयोग कोठे आढळत नाहीत. परंतु त्या उत्तम काव्याच्या कसोटीला उतरतातच, असे नाही. गद्यापेक्षा पद्याचे रूप स्वभावतःच तरल असते. आशयाचे सूचनही अप्रत्यक्ष असते. जर ते तसे राहिले नाही, तर कविता ढोबळ किंवा प्रचारी वाटू शकतात.

इयत्ता चौथीपर्यंतच्या सर्व कविता लयबद्ध, तालबद्ध आहेत. या वयाच्या मुलांची ही किमान गरज आहे. ती त्या भागवतात. यापलीकडे जाऊन इयत्ता दुसरीतील कुसुमाग्रजांची 'गवताचं पातं' आणि इंदिरा संत यांची 'बदके' ही कविता निसर्गाच्या रूपाची तरल अनुभूती देऊ शकते.

इयत्ता पाचवी ते दहावीमधे आलेले संतपंतांचे काव्य मराठी कवितेची परंपरा सांगणारे काव्य या दृष्टीने समाधानकारक आहे. त्यात अभंग, ओवी, अक्षरगणवृत्त अशी रचनेची विविधता आहे आणि विषयाची विविधताही आहे. साधुपणाचे ढोंग मिरवणाऱ्या साधूंचा समाचार घेतला आहे. (इ.६वी, चोखामेळा) खऱ्या साधूच्या अंतरंगाचे दर्शन आहे. (इ.७वी, शेख महंमद) बंधुभावाची उत्कटता आहे (इ.८वी, भरतभाव - वामन पंडित) आदर्श राज्याचे चित्र आहे. (इ.९वी रामराज्य–रामदास) कौटुंबिक आचाराविचाराला दिशा दाखवली आहे. (इ.१० वी एकनाथ) आधुनिक कवितांमधे इ. सातवीची 'संथ निळे हे पाणी' ही मंगेश पाडगावकरांची कविता निसर्गाच्या सुंदर रूपाची उत्कट प्रतीती देते आणि इयत्ता सहावीमधील कुसुमाग्रजांची 'सागर' ही कविता सागराचे निरनिराळ्या वेळी, निरनिराळ्या ऋतूंमधे होणारे दर्शन त्याबरोबर आंदोलणारे मानवी मन चित्रित करते. श्री. ना.घ. देशपांडे यांची 'समाधी' (इ.६वी) ही कविता जीवनातल्या भग्न उदासीनतेची प्रतीती देते, तर भा.रा. तांबे यांची 'जन पळभर' (इ.१०वी) ही कविता अलिप्ततेने तत्त्वज्ञानाच्या तरल पातळीवर घेऊन जाते. अशा इतरही काही सुंदर कविता आहेत.

परंतु बऱ्याच कविता काव्याच्या कसाला उतरत नाहीत. जुने सोडून नवे स्वीकारण्याचा आदेश देणारी राजेंद्र अत्रे यांची 'विज्ञानयुगाची नांदी' (इ.५वी), दुर्बलांना, दुःखितांना, शापितांना, शोषितांना साद घालणारी विंदा करंदीकरांची 'मानवांनो आत या, रे' (इ.६वी) या कविता भावनिक आवेशात गुदमरल्या आहेत. उ.रा. गिरी यांच्या 'सकाळ' कवितेतील (इ.९वी) निसर्गवर्णन केवळ सांकेतिक आहे आणि भेदभाव न करता सतत कार्य करणाऱ्या नदीवर केलेली यशवंतांची 'करु जग शोभावंत' (इ.७वी) ही कविता अगदी बाळबोध रूपक वाटते. राजा बढे यांची 'माझिया माहेरा जा'' (इ.५वी आणि इ.९वी) ही कविता शाळकरी मुलांच्या भावविश्वापासून खूपच दूर आहे.

मार्गदर्शक तत्त्वांत कविता फारच अडकली आहे, अशी शंका अनेकदा येते. इयत्ता तिसरीमधे कुसुमाग्रजांची 'आम्ही सारे' आणि संत तुकडोजी महाराजांची 'या

भारतात' या दोन्ही कवितांचा विषय देशाची एकता हा आहे. दोन्ही कवितांचा दर्जा अतिसामान्य आहे. तरी एकाच इयत्तेत. एकाच विषयावरच्या या दोन कविता कशासाठी? इतरत्रही या प्रकारची उदाहरणे आहेत. सुमार दर्जाच्या कवितांमुळे मुले काव्याविषयी उदासीन होण्याची शक्यता संभवते.

### गद्यपद्य पुनरावृत्ती

पाठ्यपुस्तकांतील पुनरावृत्तीचा विचार होणे आवश्यक आहे. बालभारतीचे बरेच पाठ कुमारभारतीमधे पुनश्च आलेले आहेत.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | इ.७वी | बोलावणं आल्याशिवाय नाही- | दिवाकर | पृ. ७५ |
| | इ.८वी | बोलावणं आल्याशिवाय नाही- | दिवाकर | पृ.४ |
| २) | इ.५वी | माझिया माहेरा जा (कविता)- | राजा बढे | पृ. १४७ |
| | इ.९वी | माझिया माहेरा जा (कविता)- | राजा बढे | पृ. १२७ |
| ३) | इ.४थी | घनश्याम सुंदरा (कविता)- | होनाजी बाळा | पृ. ११६ |
| | इ.९वी | घनश्याम सुंदरा (कविता)- | होनाजी बाळा | पृ. १४९ |
| ४) | इ.४थी | गे, मायभू (कविता)- | सुरेश भट | पृ. ११७ |
| | इ.८वी | गे, मायभू (कविता)- | सुरेश भट | पृ.१२४ |
| ५) | इ.५वी | पाटीची करामत | आनंद यादव | पृ. १११ |
| | इ.१०वी | पाटी आणि पोळी-- | आनंद यादव | पृ. ७७ |

(इ. पाचवीचा सर्व लेख पुनरावृत्त झालेला नाही, परंतु निम्म्याहून अधिक लेख दहावीच्या पाठात पुनरावृत्त झाला आहे)

या पुनरावृत्तीच्या कारणांची चौकशी केली असता पाठ्यपुस्तक निर्मितीच्या दोन संस्थांचा एकमेकींशी आवश्यक तो संपर्क नाही, असे आढळले. हा संपर्क राहू शकता, तर पुनरावृत्ती टळून आणखी वेगळ्या लेखक–लेखिकांच्या साहित्याशी विद्यार्थ्यांची ओळख करून देणे शक्य झाले असते.

### चित्रे

इयत्ता पहिली ते सातवीच्या पाठ्यपुस्तकांत अनेक चित्रे आहेत. इयत्ता सहावी आणि सातवीच्या पुस्तकांत ए-एक्स जिंदाल यांचे व्यक्तिचित्र, प्रल्हाद धोंड यांचे ताजमहालाचे चित्र, इयत्ता सातवीमधे सिस्टर परेरा यांचे स्थिरचित्र आणि श्री. शिवाजी तुपे यांचे निसर्गचित्र ही केवळ चित्रे म्हणून समाविष्ट केलेली आहेत. त्यांना कलाकृतीचे स्वतंत्र अस्तित्व आणि गुणवत्ता आहे. बाकी चित्रे अक्षरओळख करून देण्यासाठी किंवा कथा आणि कवितांच्या अनुषंगाने आलेली आहेत. रंगरेषांची लय, भावदर्शन, वातावरण परिपोष या दृष्टींनी ही सर्व चित्रे कलाकृती म्हणून अतिसामान्य आहेत. तथापि, मुलांचे लक्ष आकृष्ट करून घेण्याचे काम ती पार पाडू शकतात.





अनुक्रमणिका

इयत्ता पहिलीच्या पुस्तकाची सुरुवात चित्रवाचनाने झालेली आहे. अक्षरओळख नसलेल्या मुलांसाठी हा उपक्रम स्तुत्य वाटतो. पहिलीच्याच 'क्ष' 'ऋ' 'ज्ञ' या वर्णांसाठी शब्दचित्र दिलेले नाही, याचे आश्चर्य वाटते. वास्तविक पाहता क्षण/क्ष-किरण, ऋषि, यज्ञ/ज्ञानेश्वर यांसारखे शब्द देऊन ते चित्रबद्धही करता येऊ शकले असते. पहिलीच्या पाठ्यपुस्तकातील काही चित्रे आता कालबाह्य वाटतात. 'आ'साठी धूर सोडणारी आगगाडी (पृ.२०), 'औ'साठी डोसांचा कागद चिकटवलेली औषधाची बाटली आता अस्तित्वात राहिलेली नाही. दोन-तीन ठिकाणी परकर-पोलक्यातल्या मुलींची चित्रे आहेत. खेड्यातही प्राथमिक शाळेतल्या मुली आता फ्रॉक घालतात. परकर-पोलके घालत नाहीत.

सर्व पुस्तकांतील बहुतेक चित्रे पाठाच्या मजकुराशी सुसंगत आहेत. अपवाद फक्त दोन चित्रांचा. इ. पाचवीच्या पुस्तकात आनंदीबाई कर्वे लिखित 'मुलांचे शिक्षण' या पाठाच्या सुरुवातीला धोंडो केशव कर्वे यांचे लहानसे चित्र आहे. पाठाचा विषय धोंडो केशव नाहीत. तर स्वतः आनंदीबाईच आहेत. यामुळे येथे आनंदीबाईंचेच चित्र असायला हवे होते. इ. सहावीच्या इंदिरा संत यांच्या 'झुबे लालसर' या कवितेला परकरपोलक्यातल्या मुलीचे चित्र आहे. कवितेत 'जरा शिरावे पदर खोवूनी' अशी ओळ येते. म्हणून मुलगी साडीतली हवी होती.

### स्वाध्याय

पाठ्यपुस्तकांतील स्वाध्याय समाधानकारक आहेत. प्रश्न विद्यार्थ्यांचे आकलन जोखणारे आहेत. इयत्तेनुसार उचित बदल होत स्वाध्याय विस्तारित होत गेला आहे. स्वाध्यायातच व्याकरण समाविष्ट केल्यामुळे भाषेचे नैसर्गिक अंग म्हणून त्याकडे लक्ष जावे. स्वाध्यायातील भाषाभ्यास, लेखन, उपक्रम जर योग्य प्रकारे अभ्यासले गेले, तर विद्यार्थ्यांचे भाषाज्ञा· अधिक सूक्ष्म होऊ शकेल. सामान्य ज्ञानाच्या कक्षा रुंदावू शकतील. सामाजिक, साहित्यिक जाणीव अधिक संवेदनशील होऊ शकेल.

### उणिवा

राष्ट्रपुरुषांची चरित्रे, आत्मकथने, चिंतनपर विचार या पाठ्यपुस्तकामधे मोठ्या प्रमाणावर आहेत. शिवाजीपासून वसंतराव नाईक, विखे पाटील, इत्यादींवर लेख आहेत. डॉ. आंबेडकर, यशवंतराव चव्हाण यांची आत्मकथने आहेत. म. गांधी, गोखले, रानडे, सावरकर यांचे विचार कोठे ना कोठे येऊन गेले आहेत. परंतु कोणत्याही इयत्तेत लोकमान्य टिळकांवर पाठ नाही. इयत्ता पाचवी ते सातवीच्या विचारधनात लोकहितवादी, आगरकर, शं.द. जावडेकर, दादा धर्माधिकारी, नरहर कुरुंदकर, वि.रा. शिंदे, इत्यादींचे विचार आहेत. परंतु लोकमान्य टिळकांच्या विचारांना जागा मिळालेली नाही. इयत्ता चौथीमधील सोपानदेव चौधरी यांच्या 'महाराष्ट्र गीता'च्या एका ओळीत आणि इयत्ता आठवीतील विंदा करंदीकरांच्या 'समतेचे हे तुफान' या

कवितेतील एका ओळीत लोकमान्य टिळकांचा उल्लेख आहे, तेवढाच. बाकी कोठे नाही. महर्षी धोंडो केशव कर्वे यांच्यावरही स्वतंत्र लेख नाही. बाया कर्वे यांच्या आत्मकथनात धोंडो केशवांचा त्रोटक उल्लेख आहे. इयत्ता दुसरीमधे 'साहस' या पाठात स्वा. वीस सावरकर यांच्या बालपणातला जो साहसाचा प्रसंग आहे, तो खेड्यातल्या बऱ्याच मुलांच्या जीवनात येऊन गेला असेल. सावरकरांच्या जीवनात बालपणची देवीपुढची शपथ, मार्सेलिसच्या समुद्रातली उडी यासारखे रोमहर्षक प्रसंग असताना इतका साधा प्रसंग पाठ्यपुस्तकाने का निवडावा, असा प्रश्न पडतो.

नरहर कुरुंदकरांचे एकंदर तीन लेख आहेत. (इ.६वी विचारधन, इ.९वी बुवाबाजी आणि समाज, इ.१०वी जनतेचे राज्य) कुरुंदकरांच्या एखाद्या लेखाऐवजी पु.ग. सहस्रबुद्धे यांचा लेख आला असता, तर महाराष्ट्रातील मुलांना आणखी एका मराठी विचारवंताचा आणि त्यांच्या विचारधारेचा परिचय झाला असता.

मराठी रंगभूमीचा इतिहास श्रीमंत आहे. परंतु किर्लोस्कर, खाडिलकर, देवल यांच्या नाटकांतला एखादा वेचाही पहिली ते दहावीच्या पाठ्यपुस्तकांत आलेला नाही. फक्त रा.ग. गडकरी, वि.वा. शिरवाडकर आणि विश्राम बेडेकर यांच्या नाटकांतले वेचे आहेत. पु.ल. देशपांडे याच्या 'अपूर्वाई' या एकाच पुस्तकातून सातवी आणि आठवीच्या पुस्तकांसाठी उतोर घेतले आहेत. इतर अनेक लेखकांनी परदेशाची प्रवासवर्णने लिहिली आहेत. त्यांत जयवंत दळवी, रमेश मंत्री यांच्यासारखे मान्यवर लेखकही आहेत. त्यांच्यापैकी कोणाचाही एक लेख जरी घेतला असता, तरी मुलांना वेगळ्या प्रकारची शैली आणि दृष्टिकोनाचा परिचय झाला असता. इयत्ता पाचवी ते दहावीमधे कोठे तरी गो.नी. दांडेकरांचा आणि आठवी ते दहावीमधे दुर्गाबाई भागवतांच्या लेखनाचा परिचय होणे आवश्यक वाटते. तसा तो झालेला नाही. इयत्ता पहिली ते दहावीपर्यंत इंदिरा संत यांच्या चार कविता आहेत. कुसुमाग्रजांच्या सहा कविता आहेत. (त्याच इयत्ता नववीच्या काव्यानंदात कुसुमाग्रजांच्याच दोन कविता आहेत एक महाराष्ट्र प्रेमाची आणि दुसरी भारत प्रेमाची) शांता शेळके यांची एकही कविता नाही. पाठ्यपुस्तकातील या असमतोलाची कारणे शोधणे अगत्याचे आहे.

### अध्यापन पुस्तिका

अध्यापन पुस्तिकांचे स्वरूप फारच जुजबी आहे. पहिलीच्या अध्यापन पुस्तिकेत पाठ्यपुस्तकातील चित्रवाचनाच्या चित्राच्या खाली सूचना असल्याचे सांगितले आहे. पाठ्यपुस्तकात ही सूचना नाही. अध्यापन पुस्तिकेमधे चित्रवाचनासाठी एकंदर तीन चित्रकथा असल्याचे म्हटले आहे. परंतु तिसरी 'एकीचे बळ' ही चित्रकथा पाठ्यपुस्तकात आलेली नाही.

इयत्ता चौथीच्या अध्यापन पुस्तिकेत 'चांदोबास पत्र' या पाठाचा उद्देश, मुलांना पत्राचा मायनालेखन शिकवावे, असा असल्याचे सांगितले आहे. हा पाठ शिकवताना

शिक्षकांनी एकंदर पत्रलेखन कसे करावे, पत्ता कसा लिहावा, इ. गोष्टी मुलांना समजावून सांगाव्यात, असे म्हटले आहे. पत्रलेखन शिकवण्यासाठी कोणी काका- मामा बहीण-भाऊ, शिक्षक, इ. सोडून एखादा ग्रहगोल का निवडावा, हे समजत नाही. आजच्या जमान्यात पत्रावर पत्ता लिहिताना पिन कोड नं. कसा आणि कोठे लिहावयाचा, हे मुलांना शिकवणे आवश्यक वाटते. चांदोमामाला पत्र लिहिताना तो कसा शिकवणार ? पाठ्यपुस्तकात श्री चांदोमामा, द्वारा आकाश एवढाच पत्ता दिलेला आहे.

पाठ्यपुस्तक आणि अध्यापन-पुस्तिका यांत काटेकोर सुसंगती अपेक्षित आहे.

**काही विधायक सूचना**

१) अध्यापन-पुस्तिकांचे स्वरूप अधिक विवरणात्मक असावे. गाणी आणि कविता, काव्यानंद आणि कविता हे भेद करण्याचा उद्देश कोणता, त्याचे विवेचन पुस्तिकेत यावे. लेखक/लेखिकांची विशिष्ट लेखनामागची प्रेरणा शक्य तितकी समजावून द्यावी. मोठ्या नाटक, कादंबरी, निबंधांतून जे वेचे निवडले असतील, त्या त्या मूळ कृतींचा पूर्ण परिचय अध्यापन-पुस्तिकेत असावा.

२) वाक्यरचना, शब्दयोजना यांची काळजीपूर्वक तपासणी व्हावी.

३) एकंदर दहा इयत्तांमधे एका लेखक/कवीचे किती पाठ घ्यावयाचे, यासंबंधी काही निश्चित धोरण असावे.

४) जे राष्ट्रपुरुष आणि समाजकार्यकर्ते यांच्याशी विद्यार्थ्यांचा परिचय होणे आवश्यक आहे, त्यासंबंधीही अधिक विकित्सक दृष्टी असावी. कोणत्या इयत्तेत कोणत्या राष्ट्रपुरुषाचा परिचय होणे आवश्यक आहे, कोणाचा परिचय आत्मकथनातून व्हावा, कोणाचा निबंधाद्वारे व्हावा, कोणाचा चरित्रातून व्हावा, ते काही निकषांच्या आधारे विचारपूर्वक ठरवावे.

५) दोन निर्मितिसंस्थांनी सतत एकमेकींशी संपर्क ठेवणे ही एक महत्त्वपूर्ण गरज आहे.

अशा काही बाबतींत जागरूकपणे दक्षता घेतल्यास मराठी मातृभाषेच्या पाठ्यपुस्तकांचा दर्जा उंचावू शकेल.

*(२मे, १९९४ रोजी मराठी अभ्यास परिषद. पुणे आणि महाराष्ट्र राज्य मराठी विकास परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने 'मराठीची पाठ्यपुस्तके' या विषयावर आयोजित केलेल्या चर्चासत्रात वाचला गेलेला निबंध)*

**१०२ ब 'पूनम' (ऋता सोसायटी), २५, आयडियल कॉलनी, पौड रस्ता, कोथरूड, पुणे - ४११ ०२९.**

○○

# संकटग्रस्त मराठी

**- श्री. पु. भागवत**

...या समारोपाच्या प्रसंगी एक मुद्दा आपल्या चिंतनासाठी आपल्यापुढं मांडतो. अगदी अलीकडे, विशेषतः मुंबईत, एक शैक्षणिक आणि भाषिक वाद तारस्वरात गाजला, तो आपण ऐकला असेल. पूर्वीच्या शालेय शिक्षणक्रमात मराठी हा विषय न अभ्यासता शालांत परीक्षा पास होण्याची चोरवाट होती. महाराष्ट्रात स्थायिक झालेले भाषक अल्पसंख्य आणि इंग्रजी माध्यमाच्या शाळांतून अगदी पूर्वप्राथमिक पातळीपासून ते उच्च शिक्षणाच्या उंबरठ्यापर्यंत शिक्षण घेणारे असंख्य विद्यार्थी, त्यांचे पालक आणि त्यांच्या शिक्षणसंस्था या चोरवाटेचा गैरफायदा घेत. महाराष्ट्रात हे घडत होतं, ही गोष्ट खरोखर आश्चर्यकारक आणि विपरीत होती. संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेचा एक हेतू मराठी भाषा आणि साहित्य यांचा विकास साधण्याचा, आणि सगळा समाजव्यवहार लोकभाषेतून करण्याचा होता. लोकशाहीची ती कसोटी होती आणि महाराष्ट्राचे सरकार पुरोगामी, मराठीचं अभिमानी आणि जागृत अशी सर्वांची समजूत होती. पण शैक्षणिक क्षेत्रात राहून गेलेल्या या भाषिक चोरवाटेचा परिणाम असा झाला, की महाराष्ट्रात स्थायिक झालेला, महाराष्ट्रात उदरनिर्वाह करणारा, इतकंच काय, पण महाराष्ट्रातली व्यावसायिक, औद्योगिक आणि आर्थिक सत्ताकेंद्रं–शेवटी राजकीय सत्ताकेंद्रंही त्यातून सुटत नाहीत – तर अशी सत्ताकेंद्रं प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीतीनं आपल्या काबूत ठेवणारा एक मोठा विविधमातृभाषक समाज महाराष्ट्रात, विशेषतः मुंबईसारख्या महाराष्ट्राच्या राजधानीतच, सुखेनैव नांदू लागला. त्याला मराठी भाषेवर प्रभुत्व मिळवण्याची गरज वाटली नाही. महाराष्ट्रीय संस्कृतीचा उत्तम परिचय असावा, असं वाटलं नाही. मराठी साहित्याचं त्याला फारसं सोयरसुतक कधीच नव्हतं. संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेला ३०-३४ वर्षे लोटल्यावरही आज परिस्थिती अशी आहे, की मुंबईत घराबाहेर पडलेल्या महाराष्ट्रीयाला मराठीत फारसा व्यवहार करता येत नाही. त्यासाठी हिंदीचा किंवा इंग्रजीचा, मोडकातोडका का होईना, आश्रय घ्यावा लागतो. मराठी माणूस त्याच्या राजधानीत परक्यासारखा आणि बिभिस्त मनानं वावरतो. मराठीचीच उत्तरोत्तर होत जाणारी ही पीछेहाट थांबवावी, या हेतूनं, महाराष्ट्र सरकारनं, कधी नव्हे ते राजकीय धैर्य दाखवून शालेय अभ्यासक्रमात मराठी हा विषय अलीकडे आवश्यक केला आणि त्याची प्रश्नपत्रिका संपूर्ण १०० मार्कांची असावी, असं ठरवलं.

परिणामी ज्यांना पूर्वीच्या अभ्यासक्रमातील चोरवाटा बंद झाल्या, त्या अल्पसंख्यीयांनी आणि इंग्रजी माध्यमाच्या, विशेषतः मिशनरी शाळांनी गदारोळ उठवला. मला त्यांचं आश्चर्य वाटत नाही, पण महाराष्ट्रात ते उठून धजतात, याचं मात्र वाटतं. महाराष्ट्रीयांच्या वृत्तीतला हा उदारमतवादी लोकशाही निष्ठेचा भाग समजावा, की नेभळेपणा मानावा? की राजकीय हेतूनं दिलेल्या नाना प्रकारच्या सवलतींना सोकावलेल्या महाराष्ट्रीयेतर लोकसमूहांचा मुजोरीपणा समजावा? त्यांनी तो कलकत्त्यात किंवा तामिळनाडूची राजधानी असलेल्या मद्रासमध्ये केला असता काय? कलकत्त्यातील घरकाम करणारी मोलकरीणही आपल्या मालकणीला ''तुम्ही बंगालमध्ये कामाला आलात, तर तुम्हांला बंगाली भाषा उत्तम रीतीनं यायलाच पाहिजे'', असं बजावून सांगते; आणि मी हा अनुभव ३०-३२ वर्षांपूर्वीचा सांगत आहे. गांधीजींच्या गुजरातमध्ये गुजराती मातृभाषा नसलेल्या समाजांचा असला आडमुठेपणा चालणार नाही. इथं मात्र त्यात गुजराती शाळाचालक आणि पालक पुढाकार घेत आहेत, आणि दुर्दैवाची गोष्ट अशी, की काही ज्येष्ठ गांधीवादी आपला नैतिक पाठिंबा या अनैतिक आणि अन्याय चळवळीला देत आहेत. महाराष्ट्र सरकारच्या या शैक्षणिक, सांस्कृतिक आणि सामाजिक निर्णयाला आपण सर्वांनी निःसंदेह पाठिंबा दिला पाहिजे आणि त्याची निर्णयबुद्धी समर्थ आणि अढळ राहिली पाहिजे. लोकशाहीत राज्यकर्त्यांची निर्णयबुद्धी लोकमतानंच स्थिर राहते.

याचा अर्थ असा नव्हे, की समग्र शिक्षण मातृभाषेतून मिळण्याचा हक्क आपण महाराष्ट्रीयेतरांना नाकारावा किंवा स्वतःही सोडून द्यावा. ते तर मूलभूत आणि अबाधित असं शैक्षणिक तत्त्व आहे आणि जगभर निरपवाद त्या तत्त्वाचाच अंमल चालतो. पण ज्या राष्ट्रात किंवा राज्यात मी या ना त्या कारणाने येऊन स्थायिक होतो. त्याची भाषा– मग ती इंग्रजी असो, फ्रेंच असो, जर्मन असो, की जपानी अथवा हिंदी किंवा गुजराती –मला चांगली आली पाहिजे आणि तिच्या साहाय्यानं मी त्या माझ्या नव्या देशाच्या अथवा राज्याच्या मुख्य जीवनप्रवाहात शक्य तितक्या लवकर एकरूप झालं पाहिजे, ही गोष्ट अत्यावश्यक मानली जाते. भारतासारख्या बहुभाषक देशात मातृभाषेला तिचं अग्रस्थान देत असताना विविधभाषी लोकसमूह त्या त्या राज्याच्या मुख्य जीवनप्रवाहात एकरस कसे होतील, याची शैक्षणिक सोय करावी लागेल आणि तिचा कसोशीने अंमल करावा लागेल. महाराष्ट्राबाहेर स्थायिक झालेला महाराष्ट्रीयांचा मी याला अपवाद करणार नाही. त्यांनी त्या त्या राज्याच्या जीवनप्रवाहात एकरूप होणे, आपल्यासाठी अल्पसंख्य म्हणून खास सवलतींची अपेक्षा न ठेवणं हे त्यांच्या स्वतःच्या आणि शेवटी राष्ट्राच्या हिताचंच आहे. शिक्षणाचा प्रसार जसजसा वाढेल आणि आजवर अज्ञानांधकारात बुडालेल्या जातीजमाती आणि आदिवासी समाज अधिकाधिक शिकू लागतील, तसतसं एका राज्यातलं भाषिक शिक्षणही दुपदरी करावं लागेल. म्हणजे असं, की तिसरीपर्यंत त्या मुलांना त्या बोलभाषेत शिक्षण द्यायचं आणि मराठीचं प्रमाणरूप दुसरी भाषा म्हणून

चांगल्या तऱ्हेनं शिकवून चौथ्या इयत्तेत ती मुलं शैक्षणिक माध्यमाच्या मुख्य प्रवाहात सहज मिसळून जातील, इतकी त्यांची तयारी करवून घ्यायची, तरच ती मुलं पुढं महाराष्ट्रीय जीवनाच्या प्रधान प्रवाहाचा एकजीव भाग होतील. अशा दुपदरी व्यवस्थेची गरज सहज उमगत नाही. म्हणून सांगतो. काही वर्षांपूर्वी डॉ. विजया चिटणीस यांनी मुंबईत एक प्रयोग सुरू करून पाहिला होता. त्यांनी मुंबईतल्या दांडा विभागातील कोळयांच्या वस्तीतील प्राथमिक शाळेत 'बालभारती' हे मराठीचं पाठ्यपुस्तक शिकवलं. त्या वेळी त्यांना आलेला अनुभव धक्कादायक होता. कोळयांच्या त्या मुलांना 'बालभारती' तील सोपी पण प्रमाणभाषा तशी समजत नव्हती. त्यामुळं त्या धड्यातले विषय नीटसे उमगत नव्हते. मुंबईसारख्या पुढारलेल्या आणि दळणवळण सुलभ असलेल्या औद्योगिक शहराची ही गोष्ट, मग दूरवरच्या खेड्यांतील आणि डोंगरदऱ्यांतील मुलांची चित्तरकथा काय होईल? त्यांना शाळा मिळालेल्या असतील, त्यांच्याजवळ पुस्तकंही असतील, एकवेळ समजून चालू, की त्यांचे गुरुजी त्यांना रोज शिकवतील – पण त्यांच्यापासून शिक्षण दूरच राहिलेलं असेल. त्यांचं माध्यम असलेलं प्रमाण मराठी त्यांना तसं परकंच राहिलेलं असेल; आणि परिणामी महाराष्ट्राच्या मुख्य जीवनप्रवाहात ते गरीब नातेवाइकांसारखे अंग चोरून वावरतील. एका व्यापक अर्थानं त्यांच्या नशिबाचा वनवास संपलेलाच नसेल. आपापल्या देशातून स्वेच्छेनं किंवा सक्तीनं परागंदा झालेल्या लोकांचे लोंढे अमेरिकेत वस्तीला सारखे येत आहेत. तिथं द्वैभाषिकतेचा प्रश्न आजही आहे. इंग्रजी पुरेसं चांगलं येत नसलेल्या, स्पॅनिशसारखी अथवा चिनी-कोरियन सारखी मातृभाषा असलेल्या, मुलांचा मातृभाषेत शिकवण्याचा हक्क तिथे एक मर्यादित पातळीपर्यंत मान्य केला जातो; पण अमेरिकेची भाषा जी इंग्रजी, तिचं चांगलं ज्ञान आवश्यक केलं जातं आणि पुढं तीच शिक्षणाची आणि व्यवहाराची भाषा होते. आपल्याकडचे अल्पसंख्य ओरडा करतात, तसा ओरडा एक तर तिथं होत नाही, तो करावा, अशी परिस्थितीही तिथं राहत नाही, आणि पराकोटीच्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या आणि लोकशाही राज्यव्यवस्थेच्या त्या देशातही अशी अवाजवी कुरकूर कुणी ऐकून घेणार नाही. मला वाटतं, त्यांच्या अनुभवापासून आपल्याला बरंच शिकता येईल. शिक्षणतज्ज्ञांनी आणि राज्यकर्त्यांनी याचा विचार केला पाहिजे.

पण मराठी भाषेच्या प्रतिष्ठेचा विचार मांडत असताना मनात पाल चुकचुकते, हे कबूल करायला हवं. जिच्या मायभूमीतील प्रतिष्ठेचा आणि मान्यतेचा ऊहापोह आपण करीत आहो, त्या मराठीला भवितव्य आहे काय आणि ते किती पिढ्यांचं आहे? 'मराठी भाषा अन्याय-निर्मूलन समिती' पासून, खरं तर, त्याही आधीपासून, आजतागायत या प्रश्नाचं जाहीर विश्लेषण चालू आहे; आणि आज तरी त्याचा निष्कर्ष फारसा आशा आणि आश्वासन देणारा नाही. त्यातही उपरोध असा, की संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतरच्या गेल्या तीस-बत्तीस वर्षांच्या काळात मराठीचं भवितव्य अधिकाधिक

बिकट होताना दिसत आहे. केवळ मराठीतच नव्हे तर कदाचित, आणि कदाचितच राज्यमान्य हिंदी वगळता साऱ्याच देशी भाषांचं भवितव्य इंग्रजीच्या आक्रमणामुळं धोक्यात आलं आहे. अलीकडे पणजीच्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचं उद्‌घाटन करताना सुप्रसिद्ध कादंबरीकार श्री. भैरप्पा यांना कानडी भाषेवरील या संकटाचा उल्लेख प्रथम करावासा वाटला आणि भारतातील इतर देशी भाषांचं भविष्य कन्नडसारखंच धोक्याचं असणार, असा अंदाज व्यक्त करून, त्या संकटाबद्दल इशारा द्यावासा वाटला. इंग्रजीपासून देशी भाषांना असलेल्या या धोक्याचं स्वरूप नीट समजावून घेतलं पाहिजे. दुसऱ्या महायुद्धानंतर जगभरच इंग्रजी भाषेचं महत्त्व वाढत गेलं. सामान्य व्यवहारापासून शास्त्रीय संशोधनापर्यंत, विशेषतः त्याच्या विनिमयासाठी, इंग्रजी भाषेचा उपयोग वाढला. इंग्रज आणि फ्रेंच यांच्यांतला विरोध शतकानुशतकांचा आहे आणि फ्रेंचांच्या व्यवहारात इंग्रजीला अगदी स्थान नाही. पण अगदी अलीकडे फ्रान्समधील लुई पाश्चरच्या नावे असलेल्या जुन्या आणि अग्रगण्य संशोधनपत्रिकेत, बऱ्याच वादंगानंतर का होईना, इंग्रजीतील संशोधनपर लेखांचा समावेश होऊ लागला. त्या पत्रिकेचं फ्रेंच नाव बदलून ते इंग्रजी करावं, अशी सूचना आज तरी अमान्य झाली आहे; पण उद्याचं सांगवत नाही. यूरोपमधील प्रगत भाषांच्या आणि आधुनिक अशा अधिकाधिक देशांतही इंग्रजीच्या अध्ययनास, दुसरी भाषा म्हणून, प्रोत्साहन मिळू लागलं आहे कारण सगळ्या जगातलं शास्त्रीय ज्ञान आणि साहित्य इंग्रजीत तात्काळ भाषांतर होऊन, ज्याला पाहिजे त्याला उपलब्ध होऊ शकतं. तेव्हा सर्व भारतीयांना काय किंवा महाराष्ट्रीयांना काय, इंग्रजीचं वाघिणीचं दूध विष म्हणून टाकून देऊन चालणार नाही. इंग्रजीचं निर्दोष आणि सकस ज्ञान आपल्याला असलंच पाहिजे. त्या दृष्टीनं इंग्रजीचे अभ्यासक्रम आखले पाहिजेत, अध्यापन-पद्धतीत प्रयोग झाले पाहिजेत आणि तिचं अध्यापन कसून व्हायला हवं. मात्र एवढं म्हटल्यावर असंही निक्षून सांगितलं पाहिजे, की त्यासाठी इंग्रजी हे शिक्षणाचं माध्यम होण्याची गरज नाही. इंग्रजी भाषा काय किंवा साहित्य काय, मातृभाषेच्या माध्यमातून शिकवता येईल. इथं कविवर्य विंदा करंदीकरांचा एक अनुभव सांगावासा वाटतो : 'सोव्हिएट लँड' पारितोषिकाच्या निमित्तानं ते सोव्हिएट यूनियनमध्ये गेले होते. तिथं लेखक- प्राध्यापकांशी चर्चा करताना त्यांनी आपण मुंबईतल्या कॉलेजात इंग्रजी वाङ्मय शिकवतो, म्हणून सांगितलं. त्यांना जेव्हा विचारलं गेलं, की तुम्ही कोणत्या भाषेत शिकवता? तुमच्याच भाषेत असेल ना? तेव्हा करंदीकर म्हणाले, की नाही, इंग्रजीतून शिकवतो. त्यांचं हे उत्तर ऐकून त्या रशियन कवि-प्राध्यापकांना नवल वाटलं. ते म्हणाले, की हे कसं शक्य आहे? आम्ही इथं शेक्सपिअर शिकवतो, तो आमच्या भाषेत आणि आमचा अनुभव असा, की त्यामुळं आमच्या विद्यार्थ्यांना तो अधिक चांगला कळतो. शेक्सपिअरच्या नाटकांत ते कित्येकदा स्वतःची अशी, नवीच मर्मदृष्टी व्यक्त करतात. आणि हेच इतर विषयांचं. करंदीकरांचा अनुभव मी सारांशानं सांगितला; पण तो फार अर्थपूर्ण आहे.

त्यामुळं निदान इंग्रजी भाषा आणि साहित्य हेही मातृभाषेतून शिकवावं, असं कोणी सुचवलं, तर ते वेडगळपणाचं आणि जुनाट वाटणार नाही. तशा पद्धती संशोधन करून शोधून काढल्या पाहिजेत. इतकंच काय, पण बोलणं, वाचणं, लिहिणं आणि आकलन करणं या भाषिक कौशल्यांपैकी कोणत्या कौशल्यांना आपल्याकडील इंग्रजीच्या अध्यापनात प्राधान्य द्यावं, याचाही नव्यानं विवेक करायला लागेल. म्हणजे असं, की इंग्रजी बोलणं, तेही अगदी इंग्रज साहेबासारखं, अथवा आता अमेरिकनासारखं, या कौशल्याला अग्रस्थानाऐवजी कनिष्ठ स्थान दिलं, इंडियनिझम हे आजवर मानलं, तसं इंग्रजीच्या वापरातलं अगदी महत्पाप न मानलं, तरी चालेल, की नाही, ते पाहिलं पाहिजे. भाषाशास्त्रीयदृष्ट्या तर लहानमोठी भाषिक पापं अपरिहार्यच आहेत. पण असा काहीच विवेक न करता आपल्या सर्व जीवनक्षेत्रांत आणि व्यवहार-व्यवसायांत इंग्रजीला अवास्तव महत्त्व दिलं, आणि तिची गरज, इंग्रजीला माध्यमाच्या जागी बसवलं, तरच भागेल, असा भ्रम समाजात फैलावत गेला, तर त्याचे जे शैक्षणिक आणि सांस्कृतिक तोटे संभवतात, ते भयावह आहेत. खरं तर, ते सर्वस्वी अपरिचित नाहीत. ब्रिटिश अमदानीत त्यांचा अनुभव येत होता. पण तो अल्प होता. स्वातंत्र्योत्तर काळात ते दुष्परिणाम वाढत गेले आणि गेल्या वीस-पंचवीस वर्षात एखाद्या अनावर साथीचं रूप घेऊ लागले. स्वातंत्र्योत्तर जीवनातला हाही एक विदारक अंतर्विरोध आणि उपरोध दिसतो, की इंग्रजांचं वसाहतीचं राज्य संपलं, पण इंग्रजीचं वसाहतवादी साम्राज्य वाढत गेलं. बदल झाला असेल, तर तो इतकाच, की त्या इंग्रजीला अमेरिकन ऐट अधिक आहे. आणि त्याहीपेक्षा या वसाहतवादाला विरोध करण्याची प्रेरणा आणि प्रयत्न दूरच राहिले, उलट, त्याचं स्वागत आणि समर्थन करण्यात अहमहमिका लागलेली दिसते. विसाव्या - एकविसाव्या शतकांच्या संधिकालातील आधुनिकतेची ती प्रमुख कसोटी दिसते.

त्यात भारतीय जीवनाचं आणि संस्कृतीचं काय होईल? महाराष्ट्रापुरताच विचार केला, तर इंग्रजी माध्यमाचं आकर्षण आज पुण्या-मुंबईसारख्या मोठ्या शहरांपुरतचं मर्यादित राहिलेलं नाही. समाजातल्या उच्च आणि मध्यमवर्गीय पांढरपेशांपुरतंही ते सीमित नाही. जिल्ह्यांच्या आणि तालुक्यांच्या गावी इंग्रजी माध्यमाची मागणी वाढत आहे. ग्रामीण नवशिक्षित शेतकऱ्यांत आणि बागाइतदारांत ती वाढत आहे. शहरांत घरकाम, मोलमजुरी करणाऱ्यांत आणि कामगारांतही ती निर्माण होत आहे. इंग्रजीमुळं आपले उदरनिर्वाहाचे प्रश्न सहज सुटतात, आपली आर्थिक प्रगती सुलभ होते, आणि समाजातील प्रतिष्ठित आणि विविध क्षेत्रांतील सत्ताधारी वर्गाच्या बरोबरीचे आपण होतो, ही कल्पना महाराष्ट्रांतील अवघ्या समाजात अधिकाधिक मूळ धरीत आहे. त्यामुळं इंग्रजी माध्यमाच्या शाळांची संख्या वाढत जाईल. आज ज्या झपाट्यानं या शाळांच्या इमारतींचा विस्तार होताना दिसतो, त्यावरून त्याची सहज कल्पना करता येईल. त्यात सरकारी योजनेनुसार आदर्श म्हणून जन्माला येणाऱ्या नवोदय शाळा

तालुक्या-तालुक्यात अस्तित्वात आल्या, की या प्रक्रियेला आदर्शांच्या अनुकरणाच्या प्रवृत्तीतूनही वेग येईल. नवोदय शाळांत हिंदी किंवा इंग्रजी असा पर्याय, माध्यमिक पातळीवर का होईना, माध्यमात ठेवलेला असला, तरी इंग्रजीचीच निवड बहुतांशाने होईल. म्हणजे एक काळ असा संभवतो, की मातृभाषा मराठी हे माध्यम असलेल्या शाळा या महाराष्ट्रदेशात नगण्य आणि विनमहत्त्वाच्या उरतील– कुठं कडेकपारींत उरल्या, तर.

याचे शैक्षणिक तोटे उघड आहेत. मातृभाषेशिवाय अन्य भाषेतून मिळणारं शिक्षण अस्वाभाविक पद्धतीचं आणि कमी कसाचं असेल. या शाळांत दुसरी भाषा म्हणून मराठी शिकवली गेली, तरी ती, आज बहुतेक शाळांतून होतं, त्याप्रमाणं इंग्रजी भाषांतराच्या साहाय्यानं शिकवली जाईल आणि तिचं मराठी रूप आणि कस फार क्षीण झालेला असेल. पूर्वप्राथमिक अवस्थेतील वयातच मराठी मुलांची नाळ मराठी भाषा, मराठी साहित्य आणि महाराष्ट्रीय संस्कृती यांच्याशी तुटेल. आपल्याच देशात ती परदेशी होतील. त्यांतील कित्येक संवेदनशील मनं तर रानभरी होतील. इंग्रजी माध्यमाची ऐट कितीही मिळवली आणि त्या प्रतिष्ठेसाठी पालकांनी प्रसंगी आपलं पोट मारून कितीही खर्च केला, तरी आज आढळतं, त्याप्रमाणं या मुलांचं इंग्रजीवर निर्विवाद प्रभुत्व प्रस्थापित होणं दूरापास्त आहे. म्हणजे त्याचं मराठीचं सातशे वर्षांचं समृद्ध घर सुटेल आणि इंग्रजीचा मानवी घाटही हुकेल. मग ते मराठी साहित्य वाचू शकणार नाहीत आणि इंग्रजीतलं ते जे वाचतील, ते वाचण्यासारखं होतं का, असा त्यांना प्रश्न पडेल. त्या भाषेतलं समृद्ध आणि जागतिक अभिजात साहित्य त्यांच्यापासून, निदान त्यांच्यांतील बहुसंख्यांपासून, दूरच राहील. त्यांच्यातील माणूसपणाचं सत्त्व उणावत जसे काही वेगळ्याच जातीचे ते यंत्रमानव होतील; कार्यक्षम आणि स्वतंत्र बुद्धी नसलेले, मुक्त कल्पनाशक्तीला मुकलेले, नवनिर्मितिशील प्रतिभा आणि तिची चैतन्यशील स्वाभाविक भाषा हरवलेले, माणसाच्या मानवतेचं सार्थक करणाऱ्या सहानुभूती, प्रेम, करुणा, त्याग, इत्यादी भावना उणावलेले. मग तेव्हाच्या इंदिराबाई कविता कोणाकरता लिहितील? तेव्हाच्या गाडगीळांच्या कथा आणि मर्ढेकरांच्या कविता कोणाला थरारून टाकतील? तेव्हाच्या विश्राम बेडेकर, पेंडसे, गौरी देशपांडे यांच्या कादंबऱ्या जीवन समृद्ध करतील, त्या कोणाला? तेव्हाचे मंगेश पाडगांवकर कवितेची विविध रूपं शोधतील, ती कोणासाठी? तेव्हाच्या वसंत बापटांचं, रक्तात वाहणाऱ्या संस्कृतानं समृद्ध झालेलं, वक्तृत्वपूर्ण, नाट्यमय आणि मराठमोळं गद्य वाचून कोण वेडावेल? तेव्हाच्या तेंडुलकर-एलकुंचवारांची जीवनात नवी मर्मदृष्टी देणारी नाटकं कोण वाचील आणि पाहील? आणि तेव्हाच्या पु.ल.देशपांड्यांच्या अनंतरूपी विनोदानं हसून हसून कोण बेजार होईल? - पण हे प्रश्न गैरलागू आणि निरर्थक आहेत, कारण तेव्हा, आत्ता नावं घेतली, त्यांच्या तोडीचे प्रतिभावंत लेखक मराठीत निर्माण होतील, की नाही, याची शंकाच वाटते. मराठीचं भाषा हे स्वरूप कमी होऊन, तिला केवळ बोलीचं रूप उरलं,

तर उरलेलं असेल. आज गोव्यामध्ये कोकणी आणि मराठी यांचा वाद निरर्थक झाल्यासारखा वाटतो. कारण दोन्ही भाषा नसून अधिकाधिक बोलीच उरू लागल्या आहेत. कारण तिथं पोर्तुगीजची जागा अधिक सामर्थ्यवान आणि झपाट्यानं इंग्रजी घेत आहे. बारकाईने पाहिलं, तर आजच या मराठी लेखक–कवींची नातवंडं आपल्या आजोबांचं लेखन जाणत नाहीत. की त्यांच्या मोठेपणाची ओळख त्यांना झालेली नाही. मग आणखी काही वर्षांनी काय होईल? प्रतिभावंत लेखक-कवींचं जर हे भागधेय असेल, तर माझ्यासारख्या सामान्य संपादक-प्रकाशकांच्या नशिबाचा तर विचारच नको!

इंग्रजी माध्यमाचा आणखी एक सामाजिक आणि सांस्कृतिक तोटा सांगितला पाहिजे. इंग्रजी माध्यमाचे विद्यार्थी काय किंवा शिक्षक अथवा पालक काय, आपल्याला वरिष्ठ, आधुनिक आणि समाजात स्वाभाविक प्रतिष्ठा आणि सत्ता मिळविण्याचा जणू जन्मजात अधिकार असलेले नागरिक समजू लागतात. त्यांची राहणी, विचारसरणी, अभिरुचीही बदलून जाते, हा एक नवा अँग्लो-इंडियन वर्णच तयार होतो आणि मातृभाषेत सारा व्यवहार करू पाहणाऱ्यांना नवे नेटिव्ह म्हणून कमी लेखू लागतो. अव्वल इंग्रजी अमदानीत असा वर्णभेद रूढ होता. आज इंग्रजीत प्रसिद्ध होणाऱ्या तथाकथित राष्ट्रीय वृत्तपत्रात (National dalies) प्रादेशिक साहित्य, कला आणि संस्कृती यांना किती नगण्य स्थान दिलं जातं, हे पाहिलं, की नव्या वर्णभेदाची साक्ष पटेल. उदा., मुंबईच्या 'टाइम्स ऑफ इंडिया' चा या दृष्टीनं अभ्यास करून पाहण्यासारखा आहे. त्यात मराठी साहित्य-संस्कृतीला काहीच महत्त्व नसतं. असं म्हटलं तरी चालेल. भारतातल्या कोणत्याच प्रदेशाशी एकजीव नसणं म्हणजे 'राष्ट्रीय' असणं, अशी या वृत्तपत्राची राष्ट्रीयत्वाची व्याख्या दिसते. प्रांताप्रांताच्या सांस्कृतिक जीवनाचं सोयरसुतक नसलेलं हे भारत अथवा इंडिया नावाचं राष्ट्र कुठं आहे? या राष्ट्रीय वृत्तपत्रात एखाद्या नायपॉलची, एखाद्या पीटर ब्रुकची, एखाद्या कुरुसावाची प्रदीर्घ मुलाखत असेल; पण मराठीतील एखाद्या गंगाधर गाडगीळांची, एखाद्या विंदा करंदीकरांची, एखाद्या पु.ल.देशपांड्यांची, एखाद्या विश्राम बेडेकरांची अथवा इंदिरा संतांची दखलही नसेल किंवा केवळ दखलच असेल. तिथं वर्णी लागली, तर ती एखाद्या अँग्लो-इंडियन लेखकाची. म्हणजे मीनाक्षी मुखर्जी म्हणतात, त्या नव्या 'द्विजां' ची (Twice born) किंवा ब्राह्मणांची; देशी भाषेत लेखन करणाऱ्या शूद्रातिशूद्रांची नाही. म्हणजे स्वातंत्र्यपूर्व काळातील त्याचं अँग्लो-इंडियन स्वरूप अजून कायम आहे. जे 'टाइम्स ऑफ इंडियाचं', तेच एकूण इंग्रजी वृत्तपत्रसृष्टीचं. इंग्रजी माध्यमातून शिक्षण झालेल्या आणि इंग्रजीत सर्जनशील लेखन करणाऱ्या काही भारतीय लेखकांचा अनुभव ध्यानात घेण्यासारखा आहे. प्रारंभी वाङ्मयेतर कारणांमुळं लाभणाऱ्या अवाजवी कौतुकाचा अहंकार बाजूला ठेवता आला, तर त्यांच्या अनुभवाला असं येतं, की आपल्याला अस्सल भारतीय अनुभव, त्यातली वैशिष्ट्यपूर्ण मर्मदृष्टी आणि त्याचं

अपरिहार्य भाषिक रूप एका मर्यादेपलीकडे व्यक्त करता येत नाही. परभाषेची एक आंधळी आणि अभेद्य भिंत आपल्यापुढं उभी राहते आणि आपल्या हृदयाच्या अंतरर्हृदयातला अनुभव अव्यक्तच राहू लागतो. व्हिक्टर अनंतसारखा लेखक मग वैतागानं आणि विषादानं ''आम्ही सारे मेकॉलेचे लेकावळेच आहोत'' ('We are all Macauley's bastards') असे उद्गार काढतो. तर आर्.पार्थसारथीसारखा कवी हताशपणे आणि आत्मकरुणेनं इंग्रजीत लिहिण्याच्या आपल्या विद्यार्थिदशेपासूनच्या उद्योगाचं वर्णन ('Whoring after English gods') असं करतो. त्याच्या जरा भडक भाषेमागं दडलेली त्याची वेदना उमगते आणि मन चरकून जातं. प्रतिभावंतांची सर्जनशीलताच अशी अवरुद्ध झाली, तर त्यासाठी कुरूप आणि वांझ आणि अमंगल गोष्ट दुसरी नाही.

इंग्रजीचं हे आक्रमण जुनं आणि सहज कळण्यासारखं आहे. पण मराठीवरील अंतर्गत संकट वाढत आहे. आणि ते तितक्या सहज ओळखता येत नाही. या देशात चौदा राष्ट्रभाषा आहेत. आणि त्यांची प्रतिष्ठा समान आहे. ते तात्त्विकदृष्ट्या निरपवाद असलेलं सत्य पंडित जवाहरलाल नेहरूंनी वारंवार आणि आग्रहपूर्वक मांडलं. दिल्लीच्या मराठी साहित्य संमेलनातील उद्‌घाटनाच्या भाषणात त्यांनी त्याचा केलेला ठाशीव उच्चार अजून मला आजही आठवतो. हिंदी ही त्या राष्ट्रीय भाषांपैकी एक आणि सोयीसाठी भारतीय आणि आंतरप्रांतीय राज्यकारभाराची भाषा म्हणून मान्यता पावलेली भाषा. काळजीपूर्वक पाहिलं, तर मराठीवरील तिची छाया वाढत आहे, असं दिसेल. फार उदाहरणं देत नाही. पण आजवर मराठीत कोणताही समारंभ छान 'साजरा' होत असेल; आता तो 'संपन्न' होतो. पुस्तकाचं सुंदर समारंभपूर्वक 'प्रकाशन' पूर्ण व्हायचं; आता त्याचं 'विमोचन' होतं; जणू काय ते त्या क्षणापर्यंत बंदीतच होतं! आता महाराष्ट्रात 'मिरवणूक' निघत नाही; 'शोभायात्रा' निघते. हिंदीचं प्रमाणरूप अधिकाधिक संस्कृतनिष्ठ होत आहे. सामान्य हिंदीभाषकांना त्यापासून फायदेतोटे काय अनुभवाला येत असतील, कोण जाणे. पण नागरी प्रचारिणी सभेची ही संस्कृतनिष्ठ नवी आणि कृत्रिम हिंदी आपल्यालाही समजत नाही, अशी तक्रार पंडित नेहरू वारंवार करीत. मराठीच्या दृष्टीनं त्यातली अडचण अशी, की अनेक संस्कृत शब्द मराठीत आणि हिंदीत वेगवेगळ्या अर्थानं वापरले जातात. आकाशवाणीवरील किंवा दूरदर्शनवरील हिंदी बातम्या ऐकताना याचा अनुभव येतो. लोकसभेत एखादा खासदार दुसऱ्याच्या मुद्यावर 'आपत्ती' कशी आणतो, ते त्या शब्दाचा मराठीत रूढ असलेला अर्थ जाणणाऱ्या श्रोत्याला समजत नाही. तीच गोष्ट 'आत्मसमर्पणा'ची. आता संस्कृतोद्‌भव अथवा संस्कृतप्रचुर भाषांत अशा अर्थभेदांचा प्रश्न स्वाभाविक आहे, हे खरं. बंगाली-मराठी, गुजराती-मराठी, कन्नड-मराठी या भाषांतही तो आहे. पण राज्यकारभाराची भाषा म्हणून देशभर हिंदीची जी राणीव चालते, तीमुळं हिंदीतील या अर्थभेदांबद्दल अधिक सावध राहायला हवं. खरं म्हणजे, संस्कृतोद्‌भव परिभाषेमुळं आणि संस्कृतप्रचुर

भाषेमुळं खुद्द मराठीही सर्वसामान्य श्रोत्यांच्या आकलनाबाहेर जाऊ लागेल, की काय, अशी भीती वाटते. आकाशवाणीवर पूर्वी कार्यक्रमाची साधी 'घोषणा' व्हायची आणि ती पुरायची; आता 'उद्घोषणा' होते. आता माणसं 'भाषण' किंवा 'व्याख्यान' देत नाहीत, तर 'अभिभाषण' करतात. 'वाचन' करीत नाहीत, तर 'अभिवाचन' करतात. 'उद्' किंवा 'अभि' या उपपदांमुळं त्या शब्दांच्या अर्थांत काय भर पडते आणि ती कितपत अपरिहार्य असते, कोण जाणे. 'उरलेला' च्या जागी उर्वरित वापरल्यामुळं विद्वत्तेच्या प्रतिष्ठेचा जो भास होतो, त्याची त्या जागी खरोखर आवश्यकता असते काय? दूरदर्शनवर दिसणारी कार्यक्रमाची अथवा श्रेयनामावलीची एकही पाटी शुद्ध नसते. मी काही शेतकरी नाही, पण 'आमची माती, आमची माणसं' हा कार्यक्रम पाहतो. त्यात भाग घेणारा आणि उत्स्फूर्तपणं बोलणारा एखादा शेतकरी आपली अस्सल बोली बोलतो, तेव्हा फार जिव्हाळा वाटतो. सरकारच्या शेतीखात्यातले अधिकारी किंवा तज्ज्ञ काय, किंवा कृषिविद्यापीठांतले विद्वान प्राध्यापक काय, शेतकऱ्याचंच म्हणणं संस्कृतप्रचुर आणि ग्रांथिक भाषेत मांडू लागतात, तेव्हा ते कोणा शेतकऱ्यांना किती समजत असेल, अशी शंका येते. ते तज्ज्ञ शास्त्रीयतेच्या भ्रमानं नको तितकी परिभाषा वापरतात, नको तितके संधी किंवा समास, आणि तेही बहुधा चुकीचे करतात. त्यांच्या त्या भाषेच्या वावटळीत आमच्या गरीब शेतकऱ्याची जिवंत आणि स्वाभाविक, अर्थपूर्ण आणि सरावाची बोली पालापाचोळयासारखी उडून जाईल, की काय, अशी भीती वाटते. गेल्या काही वर्षांत आमच्या राजकीय पुढाऱ्यांनी 'दृष्टिकोनातून', 'माध्यमातून', 'अंतर्गत', 'दरम्यान' यांसारखे शब्द किती चुकीच्या अर्थानं आणि अनावश्यकपणे रूढ केले आहेत, ते बारकाईनं पाहावं. तेराव्या शतकातल्या महानुभाव नागदेवाचार्यांनी आपल्या शिष्याची पांडित्यपूर्ण कविता वाचून म्हटलं : ''तुझ्या रचनेतले हे 'अस्मात्', 'कस्मात्' हे प्रयोग काय कामाचे? त्यामुळं माझा सामान्य परिवारु नागवैल की''- त्या इशाऱ्याची आज पदोपदी आठवण येते. सदोष भाषाप्रयोगांनी भरलेली आणि लेखनातली शुद्धता नावापुरतीच असलेली पुस्तकं मराठीत आज बहुसंख्येनं प्रसिद्ध होतात आणि याची क्षिती प्रकाशकाला नसते, की लेखकालाही नसते. वाचक तर अनभिज्ञ आणि बेपर्वा असतो. वृत्तपत्रांना घाईची तरी सबब असते. तीमुळं त्यांतील भाषादोष क्षम्य मानले नाहीत, तरी समजून घेता येतात. तरी अगदी अलीकडे, रस्ते डांबरी करण्याचा कार्यक्रम या साध्या अर्थी 'रस्ताडांबरीकरणकार्यक्रम' असा मालगाडीसारखा समास वाचला, तेव्हा त्याचं प्रयोजन समजून घेणं फार कठीण गेलं. कोणताही भाषा बदलत्या जीवनव्यवहाराप्रमाणं बदलते, हे खरं. तिचं प्रमाणरूपही बदलत असतं. मराठीबाबत तसं घडत असलं, तर ते स्वाभाविक मानलं पाहिजे. पण आज मराठीत होणारे हे बदल तसे नाहीत. पुष्कळदा ते विचाराची पोकळी लपवण्यासाठी केलेले असतात. अनेकदा प्रतिष्ठेच्या मोहानं किंवा नावीन्याच्या सोसानं जन्माला येतात; आणि सामान्यतः अज्ञानातून उद्भवतात. वाचणाऱ्या-ऐकणाऱ्या

अज्ञानातून आणि लेखक-वक्त्यांच्या भाषासौंदर्याविषयीच्या बेपर्वाईतूनही. भाषा ही एक सामाजिक निर्मिती आहे. याचा अर्थ असा, की भाषेत रूढ असलेला एखादा शब्द अथवा एखादा प्रयोग जेव्हा अकारण बदलला जातो आणि त्या जागी दुसऱ्याचा उपयोग होऊ लागतो, तेव्हा अनेक वर्ष किंवा शतकं उपयोगात असलेली सामाजिक शक्ती वाया जाते आणि नवी खर्ची पडते. असा हा मानवी शक्तीचा दुप्पट आणि दुहेरी अपव्यय आहे. तो सावधपणं टाळायला हवा. त्याचप्रमाणं ध्यानात ठेवायला हवं, की भाषेचं प्रमाणरूप ठरवताना काय, किंवा ते बदलताना काय, तिची स्वाभाविक बोलीशी असलेली नाळ पूर्णपणं तुटता कामा नये. प्रमाणभाषेतलं बोलीचं अदृश्य पण चैतन्यपूर्ण स्पंदन अखंड चालू राहिलं पाहिजे. ते थांबलं, तर त्या भाषेचं मरण ओढवलं, असंच समजावं.

मला वाटत, याचं मुख्य कारण मराठी भाषेच्या प्राथमिक शाळेपासून होणाऱ्या अपुऱ्या आणि कदाचित चुकीच्या अध्यापनात आहे. अभ्यासक्रमात भाषाविषयाला योग्य ते महत्त्वाचं स्थान आज उरलेलं नाही. त्या विषयाचे शिक्षक, त्यांच्या प्रशिक्षणाच्या सदोष अभ्यासक्रमामुळं, पुरेसे तज्ज्ञ आणि अध्यापनकुशल नसतात. भाषेची पाठ्यपुस्तकं फार असमाधानकारक असतात. अत्रे, घाटे यांच्या 'नवयुग वाचनमाले'शी किंवा खांडेकरांच्या 'मंगलवाचना'शी अथवा श्री.बा. रानड्यांच्या 'महाराष्ट्र-रसवंती'शी त्यांची तुलना करून पाहावी. आणखी असं, की इतर विषयांच्या पाठ्यपुस्तकांचं, भाषेच्या पाठ्यपुस्तकांतील भाषिक धोरण आणि पातळी यांच्याशी असलेलं नातं दुबळ असतं. सगळे विषय हे शेवटी भाषाविषय असतात, हे प्राथमिक शिक्षणातलं तत्त्व आजही अबाधित आहे. ते साक्षेपानं अमलात मात्र येताना दिसत नाही. त्यामुळं सरकारी शिक्षणखातं काय, अथवा त्याच्याशी संबंधित असलेले इतर विभाग काय, त्यांनी मराठीच्या रक्षणाचं आणि विकासाचं हे मूलभूत काम महत्त्वाचं मानलं पाहिजे आणि त्याला मनानं तरी जुंपून घेतलं पाहिजे. राज्य मराठी विकास संस्थेची स्थापना नुकतीच झाली आणि ती इष्ट अशीच गोष्ट झाली. मराठीच्या विकासाच्या अनेक योजना ही संस्था आखील. त्यांत मराठीचे सर्व पातळ्यांवरचे अभ्यासक्रम, अध्यापनपद्धती, आणि मुख्य म्हणजे मराठीच्या अध्यापकांची गुणवत्ता सुधारण्याच्या कल्पनांना प्राधान्य द्यायला हवं. ते काम पायाभूत महत्त्वाचं आणि सर्वांगीण भाषाविकासाला चालना, स्वरूप आणि आधार देणारं आहे. कोणत्याही जिवंत भाषेचं एक लक्षण म्हणजे तिच्या शब्दा-शब्दाच्या निर्दोष वापराबद्दल, अर्थाच्या औचित्याबद्दल आणि प्रयोगाप्रयोगाच्या समर्पकतेबद्दल होणारी अविरत चिकित्सा जगभर आपलं अधिराज्य गाजवू पाहणाऱ्या इंग्रजीत ती आजही अखंड चालताना दिसते. 'न्यूयॉर्क टाइम्स' च्या साप्ताहिकात विल्यम सफायर नावाचा लेखक दर अंकात ती किती कसोशीनं आणि चटकदारपणं करतो, ते पाहण्यासारखं असतं. आपल्याकडील 'फ्रंटलाइन' या पाक्षिकात ती चर्चा पुनर्मुद्रित होते. 'भाषा आणि जीवन' या त्रैमासिकात

मराठीची तशी चिकित्सा अधूनमधून होते. 'महाराष्ट्र टाइम्स' त्याकडे आवर्जून लक्ष पुरवतं. पण लोकप्रिय आणि शास्त्रीय अशा दोन्ही पातळ्यांवर मराठीची भाषाचिकित्सा किती तरी वाढायला हवी. आकाशवाणीचा त्यासाठी उपयोग करून घेता येईल आणि आज मराठी भाषेच्या हिताबद्दल बेपर्वा आणि बाधक ठरलेल्या दूरदर्शनसारख्या माध्यमांचा कल्पकतेनं उपयोग करून घेता येईल. भारत सरकार आपल्या खात्यांच्या आणि उपक्रमांच्या कारभारात हिंदीचा वापर किती आणि कसा होतो, तो वाढत आहे, की नाही, याची दक्षतेनं वारंवार पाहणी करताना दिसतं. ते त्याचं घटनानियत कामच आहे. खासदारांच्या आणि तज्ज्ञांच्या समित्या देशभर हिंडून ही तपासणी करतात. महाराष्ट्र सरकारनं मराठीच्या वापराबद्दल अशी पाहणी कसोशीनं करायला काय हरकत आहे? केवळ सरकारी खात्यांच्या कारभाराचीच नव्हे, तर बिनसरकारी किंवा खाजगी कचेऱ्यांच्या कामातील मराठीच्या वापराचीही तपासणी करायला हवी. अशा बाबतीत जसा राजा, तशी प्रजा, हा न्याय लोकशाहीतही प्रभावी होतो. या कामात काही घटनात्मक किंवा कायदेशीर अडचणी असल्या, तर त्या दूर करून घेण्याचा प्रयत्न जोराने करायला हवा.

अखेरशेवटी हा प्रश्न तुम्हांआम्हां सामान्य नागरिकांच्या जागरूकतेचा आहे. त्यांची अखंड सावधानता आणि जागरूकता ह्यांनी स्वातंत्र्याचं आणिं लोकशाहीचं रक्षण होतं. लोकांची भाषा या लोकशाही जीवनाच्या माध्यमाची प्रत्येक नागरिकानं कठोर आणि निरंतर साधना केली, तर मराठी भाषेला मरणाचा धोका नाही. तिचं रूप बदलत राहील, पण तिचं भवितव्य – आणि तिच्यातून मूर्त होणाऱ्या साहित्यसंस्कृतीचं भवितव्य– सुरक्षित राहील.

*(मु. केळवे. ता. पालघर, जि. ठाणे येथे दि. १७ एप्रिल, १९९४ रोजी भरलेल्या दुसऱ्या कोकण मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेले समारोपाचे भाषण --थोडेसे संपादकीय संस्कार करून.)*

**मातृस्मृती, प्लॉट ७४, स्कीम ६, रोड ४, शीव (पूर्व), मुंबई ४०००२२.**

○○

**शब्दनिष्ठा आणि विनोद**

दोन यहुदी पर्यटक प्रथमच इस्रायलला भेट देत होते.

इस्रायलची राजधानी तेल अविव बघून झाली. दिवस मोठा मजेत गेला, पण त्यामुळे आलेला शिणवठा घालवण्यासाठी ते एका नाईट क्लबमध्ये आले.

मंचावर एक विनोदी सोंगाड्या हिब्रू भाषेत धडाकेबाज विनोद सांगत होता.

असे थोडे चुटके ऐकल्यावर त्या पर्यटकांपैकी एकाच्या हसून हसून मुरकुंड्या वळल्या. अगदी तोल जाऊन स्वारी खुर्चीवरून खाली पडली.

त्याचा सोबती आश्चर्यचकित होऊन त्याला विचारतो,

'कमाल आहे तुझी! तुला तर हिब्रू भाषेचा एक शब्दही कळत नाही, हसतोहेस कशापायी?'

'म्हणजे काय? हे एवढे सगळेजण हसताहेत, बघ, माझा, बुवा, भरवसा आहे त्यांच्यावर!' दुसऱ्याने शांतपणे उत्तर दिलं.

# विद्यमान मराठी : एक अनागर अबोली

- द.भि.कुलकर्णी

अगदी मराठी ४थी पर्यंत – म्हणजे १०-११ वर्षांचा होईपर्यंत मला काही काही शब्दांचा धड उच्चार करताच येत नसे. त्याच्या आधी मी ठार बोबडा बोलत होतो किंवा काय, ते आठवत नाही; पण काही काही शब्दांसाठी बहिणी माझी चेष्टा करीत आणि मास्तर पाठीत गुद्दा देत, हे मात्र पक्क आठवतं. त्यांतल्या त्यांत दोन शब्द माझा पिच्छा पुरवीत. आता शहाणपणाचा मार्ग हा नव्हता का, की ते शब्द मुळी वापरायचे नाहीत? पण नाही; नेमके तेच शब्द राहून राहून माझ्या जिभेवर येत. एक शब्द 'पश्चिम'. हा शब्द मी हटकून 'पच्छिम' असा ठासून उच्चारी. आता हा शब्द असा कितीदा उच्चारावा लागतो? फार तर शाळेत भूगोलाच्या तासाला; पण नाही. तिथे तर तो मी उच्चारीच (आणि मास्तरांचा गुद्दा आणि मित्रांचं हसणं खाईच!), शिवाय घरीदेखील 'पच्छिम दिशा पाहा कशी छान दिसतेय्' वगैरे तारे तोडून बहिणींना खाद्य पुरवी.

यापेक्षा कहर म्हणजे 'प्रेम'. आता तेव्हाच्या लहान मुलांचं प्रेमाशी काही घेणंदेणं नसायचं. आईच्या आणि देशाच्या धड्यांतही 'आईची माया', 'देशभक्ती' असे छान शब्द असायचे; पण मला सुरसुरी यायची. बहिणी भरतकाम करीत असायच्या आणि त्यांचं बोलणं रंगात आलेलं असायचं. त्यात राहून राहून 'रिंग', 'जीग', 'रेशीम', 'क्रोशा', 'फ्रेम' असे शब्द यायचे. मग न राहवून मी म्हणायचो,

''अक्का, अक्का, मी तुला एक मोराचं चीत्र आणून दिलं, तर त्याला तू प्रेम करशील?''

सगळ्याच खिदळायच्या. फक्त अक्का व्याज-गांभीर्यानं म्हणायची,

''हो, रे, बाळा, तू मला मोराचं चित्र आणून दिलं, की मी त्याला खूप प्रेम करीन.''

त्यावर माझं कातावणं,

''अग 'प्रेम' नाही; 'प्रे-म'.

'श्च' आणि 'फ' यांचं माझ्या जिभेला तेव्हा एवढं का वावडं होतं, कुणास ठाऊक. तेव्हा कळत नव्हतं, पण आता कळतं, की आणखी एका उच्चाराचं माझ्या जिभेला वावडं आहे अजूनपर्यंत. 'ध्य'. 'ध्येय' हा शब्द मी अजूनही हटकून 'धेय' असाच उच्चारतो. काही केलं, तरी त्याच्या उच्चाराचं 'ध्येय' काही मला गाठता येत नाही. आजवर इतकं





अनुक्रमणिका

मराठी शिकविले आणि इतकी भाषणं दिली; पण हा जिव्हादोष काही कोणी सांगितला नाही. श्रोते किती सज्जन असतात, पाहा! बालगंधर्वांनादेखील 'वसंत' मधील 'व' उच्चारता येत नसे, ते नेहमी 'बसंत'च म्हणायचे, असं जेव्हा वाचलं, तेव्हा कुठं माझा जीव भांड्यात पडला.

जे उच्चाराचं, तेच अर्थाचं. काही शब्द आणि त्यांचे अर्थ, कसे कुणास ठाऊक, मनात खोलवर रुतून बसत, तर काही शब्दांचे अर्थ कधी कळंतच नसत.

एका गांधीवादी पाहुण्याने एकदा सर्व बाळगोपाळांना 'तकवा' आणि 'थकवा' यांतील फरक विचारला होता. तेव्हा सर्व खिदळणाऱ्या बहिणी गप्प. अस्मादिक मात्र पट्कन म्हणाले होते,

"चहानी थकवा जातो, दुधानी तकवा येतो."

तेव्हा त्या गांधीवाद्याने आपल्यातील एक अख्खी खारीक मला दिली होती; पण मग 'पांग फेडणे, 'पांगारा', 'रसातळ', 'लेह्य' अशा शब्दांपाशी आमची सर्वांचीच गाडी अडली.

नागपुरी मराठीत 'लेहाडा' असा शब्द आहे. आमच्या जुन्या मोलकरणीने बदली म्हणून एक महिन्यासाठी आपल्या नात्यातल्या एका बाईला आणले होते. आई तिची चाचणी घेत होती आणि ती नवाडी बाई प्रत्येक दोन वाक्यांगणिक 'नाय, बाई, मी काय लेहाडी, चोमडी नाय, हां' असे ध्रुवपद आळवीत होती. तेव्हा लेहाडेपणा, चोमडेपणा हा काही तरी दुर्गुण आहे, एवढे तर कळले; चोमडेपणाचा गोळाबेरीज अर्थही कळला; पण 'लेहाडा' हा काय प्रकार आहे, ते किती तरी वर्षे कळेना. तो शब्द मनात तसाच झोपून होता.

परवा बोलता बोलता इथल्या एका गर्भदरिद्री माणसाचा विषय निघाला. वास्तविक नागपुरात गर्भश्रीमंत खूप. घरी खायला-प्यायला नसले, घरावर कर्ज असले, तरी त्यांची दिलेरी अबाधित. सगेसोयरे असोत, मित्र असोत, मानवाईक असोत, नाही तर उलफत्तू माणूस असो, तो घरी आला, की त्याचे भरघोस आणि मनःपूर्वक स्वागत करायचे, हा या गर्भश्रीमंत माणसांचा स्वभाव. (आता ही जमात लोपत आहे, हे 'पच्छिम' महाराष्ट्रातल्या पाहुण्यांनी लक्षात घ्यावे.) याच्या उलट गर्भदरिद्री. श्रीमंती आली, तरी अशा माणसाच्या मनाचे दारिद्र्य जात नाही. पदोपदी प्रगटते. (आता ही जमात पश्चिम महाराष्ट्रात लोपत आहे, हे वैदर्भीयांनी लक्षात घ्यावे.) तर अशा एका गर्भगरीब माणसाबद्दल परवा माझा वऱ्हाडी मित्र म्हणाला,

"अरे, तो भलताक दलिद्दर माणूस आहे. लेहाडा. हर चीज चाटून चाटून खाते. मंग त्यो चुना ऱ्हावो, का सिमेंट ऱ्हावो."

त्याक्षणी मला 'लेहाडा' चा अर्थ कळला. खाद्य, पेय, चोष्य आणि लेह्य या शब्दांचे अर्थ माहीत होते; पण या 'लेह्य' पासून 'लेहाडा' बनला आहे, हे कुठं माहीत होतं?

जो कुठलीही गोष्ट चाटूनपुसून खातो, तो लेहाडा नाही; तर जो प्रत्येक गोष्टीसाठी जिभल्या चाटत असतो, जो त्यासाठी दुसऱ्याचे बूट सुद्धा चाटतो, तो लेहाडा! अतिलोभी आणि शिवाय वर निर्लज्ज.

साठपैकी चोपन्न वर्षे तरी कमीत कमी माझी नागपुरात गेलीत. जन्म इथलाच. कुलकर्णीपणाचं गाव विदर्भातलंच; पण नागपुरी- वऱ्हाडी बोली काही जिभेवर बसली नाही. मनात फार प्रेम असूनही. कारण बालपण दक्षिण नागपुरातील हम्पयार्डमध्ये. म्हणजे खास अँग्लोइंडियन, पारशी, ख्रिश्चन यांच्या वस्तीत. कुमार वय पश्चिम नागपुरामध्ये म्हणजे पुणेरीचे वर्चस्व असलेल्या वस्तीमध्ये. पण हे काही खरं नाही. कारण माझे चित्पावन श्वशुर अजूनही ''या गर्मीच्या दिवसांत एक नांद खरेदी करा'', ''आता घरी वाढीकाम काढून राह्यलो'' असेच बोलतात; आणि मी त्यांच्या तोंडाकडे बह्याडासारखा पाहत राहतो; मला काहीच कळत नाही.

पण आता मी मनावर घेतले आहे. आनंद यादवांची बोली न कळली, तर न कळो, पण आपली नागपुरी-वऱ्हाडी आत्मसात करायचीच. त्यासाठी मास्तरही अगदी झकास मिळाला आहे. बापुराव माळी. आमच्या घरी नवाडाच आहे. एकदम हिंदी चित्रपटातील माळयासारखा : घरमालक बागवान वाटेल आणि माळी घरमालक वाटेल, असा. स्वच्छ, उजळ रंग, गांधी टोपी, जुन्या फॅशनचा शर्ट, धोतर, खांद्यावर जरीकाठी गमछा. सारे स्वच्छ आणि पांढरेशुभ्र. आपण बरे, की आपले काम बरे. नियमित आणि वक्तशीर, स्वतःहून बोलणे नाही. त्याच्याशी रोज दोन-चार वाक्ये बोललो, तरी माझे काम भागते. संदर्भ - कार्डेच तयार केली आहेत. त्यांत रोज दोन-चार, दोन चार शब्दांची भर पडून राहिली आहे. मोठे मधुर आणि अन्वर्थक शब्द. मात्र त्यांतील हेल, खटके, दाब आणि आणखी काहीतरी (काही तरी नव्हे!) ऐकले पाहिजे.

परवा पिल्ला त्या झाडणीशी खेळत होता आणि खेळता खेळता एका छोट्या झाडापाशी गेला आणि माती उकरायला लागला. माझा जीव पिल्ल्यात. मी म्हटलं,

''बापुराव, अरे, या पिल्ल्याला काय झालं असं करायला?''

त्यावर बापुराव म्हणतो,

''काही नाही, साह्येब, त्याले काहीतरी वारवा लागला असंल.''

माझी लगेच कार्डावर नोंद. गुपचूप.

'वारवा म्हणजे दुरून येणारा अस्पष्ट वास.'

बुंध्यापासून छाटलेल्या झाडाला बापुराव म्हणणार,

''आधवा.''

फांदी वाकली, की म्हणणार,

''साह्येब, ह्ये खांदी लई बागली, बगा.''

'धमकून' (खूप), 'फुसकारलं' (बहरलं), 'पन्नावली' (ताणली) असे नुसते शब्द



अनुक्रमणिका

कळून भागत नाही; ती पदं, की पदिम काय म्हणतात, त्या स्वरूपातच ग्रहण केली पाहिजेत; नुसती वाचली नाही पाहिजेत, ऐकली पाहिजेत.

या निरक्षर गुरूला काय मी दक्षिणा प्रमाण भाषेची द्यायची? त्याच्या वाणीतला सर्व गोडवा घालवून टाकायचा? 'जेथीचिया कृपा लाभे वरू। तेथीचि मने व्यभिचारु। तरी काई मी भस्मासुरू। अर्जुनु म्हणे?'

ज्ञानेश्वरांनी या पेचावर मात केली आहे. ती मातु ऐकण्यासारखी आहे. गोविंदप्रभू चरित्रातील भाषा वऱ्हाडी. लीळाचरित्रातील गद्य तर सताल गद्य. एकमुखी–पाठांतर सुलभ. (महानुभाव पंथ हा गोपनीय उपासना पंथ असावा, असे कधी कधी वाटते. म्हणून तर तिथे सांकेतिक लिपी आणि 'श्लेष म्हणजे व्यतिरेक' असे घडले नसेल ना?) ज्ञानेश्वरांनी आपली ओवी जशी गद्य, पद्य आणि संगीत अशी त्रिमुखी केली, तशीच त्यांची भाषाही त्रिमुखी : नागर बोल. नागरी मराठी म्हणजे प्रमाण मराठी आणि बोल म्हणजे बोलीभाषा. या दोन रूपांना त्यांनी तिसऱ्या आपल्या प्रातिभ वाणीची जोड दिलेली. त्यांच्या अंतःकरणातील सारी वत्सलता, बोलीतील सारा गोडवा आणि प्रमाण मराठीतील सारी प्रमाणबद्धता त्या अभिव्यक्तीने आत्मसात केलेली.

आज खेड्यातली माणसेसुद्धा आपल्या बोलीमध्ये प्रमाण मराठी व इंग्रजी यांचे असे मिश्रण करतात, की ती एक हेंगाडी पोट-भाषा पोटार्थी भाषा होऊन जाते. (बापुराव अपवाद). शहरातली मानवाईक माणसे इंग्रजी-हिंदी-मराठी मिश्रित अशी पाठ-भाषा वापरतात, की त्यांना कोपरांपासून नमस्कार करावा. पु.भा.भावे यांचे अनेक भक्त नागपुरात आहेत. त्यांच्याशी 'दूरध्वनी'वरून बोलायचे म्हटले, तरी 'प्रतिनिमिष' मला 'सहस्र' वेळा विचार करावा लागतो. इतकी त्यांची भाषा शुद्ध कृत्रिम.

हिंदी, इंग्रजी, संस्कृत यांच्या दबक्यातून निर्माण झालेली नव्हे, तर महाराष्ट्रातील अनेक जिवंत बोलींतून शब्द, वाक्प्रचार, म्हणी घेऊन 'शुद्ध' झालेली नवी प्रमाण मराठी सिद्ध करता येईल का? त्यांच्यांतील हेल, खटके, कंप, आदी आत्मसात करून प्रमाण मराठीलाच अधिक प्रमाण बनवता येईल का? की हाही एक कृत्रिम प्रकारच होईल?

ते काही असो. आजच्या शहरी मराठीतील कृत्रिमता, कोरडेपणा आणि क्षीण शब्दसंख्या या त्रुटी गेल्या प पाहिजेत, तिला पद्याच्या आसपास पोचणारी मुक्त आवर्तने, गद्याचा थेटपणा आणि गाण्याची आठवण करून देणारा लहेरा मिळाला पाहिजे. तेव्हाच बापुरावची गुरुदक्षिणा चुकती केल्यासारखी होईल; बापुरावकडून काही दक्षिणा घेता येईल.

**जंतरमंतर अमरावती मार्ग, नागपूर - ४४० ०१०, दूरध्वनी ५३२३१७**

○○

# 'बडुवा' आणि 'गाउ' : अर्थवेध

- विजया तेलंग

षढरपूरचे 'बडवे' हे कुलनाम कसे आणि कोठून आले, त्याचे मूळ कोठे सापडते, याचा शोध भाषिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या महत्त्वाचा ठरेल.

वि.का. राजवाडे यांनी म्हटले आहे,

''बड हा शब्द बडवै, बडवई, बडपति अशा परंपरेने बडपती ह्या शब्दापासून निघालेला दिसतो. बड या शब्दाचा अर्थ शालिवाहनाच्या बाराव्या शतकात 'स्तुती' असा होता. ह्याच बड धातूपासून बडबड, बाड वगैरे शब्द निघाले आहेत. एवंच, बडवई, बडवै, बडवे म्हणजे स्तुतिपाठक होत.'' [१]

राजवाडे यांचा हा तर्क व्युत्पत्ती शोधण्याच्या त्यांच्या पद्धतीशी सुसंगत असला, तरी वस्तुस्थितीशी विसंगत आहे. भा.पं. बहिरट आणि प.ज्ञा. भालेराव यांचे पुढील विधान राजवाड्यांच्या व्युत्पत्तीवर पडदा टाकणारे आहे.

''राजवाडे यांनी याप्रमाणे तर्क केला आहे, परंतु त्यास कागदोपत्री अगर शिलालेखाचा पुरावा उपलब्ध नाही.'' [२]

'बडवे' या शब्दाचे अगर कुलनामाचे मूळ 'बडवणारे' या कल्पनेत (प्रथेत ?) शोधणे हा कल्पनाविलास वाटला, तरी त्यातील संभाव्य वास्तव चोखामेळा यांच्या पुढील चरणात आढळावे : [३]

*''धांव घाली, विठु, आतां चालूं नको मंद*
*बडवे मज मारीती, ऐसा कांहीं तरी अपराध''*

'बडुवा' हा शब्द 'लीळाचरित्र' आणि 'श्री गोविंदप्रभुचरित्र' यांसारख्या प्राचीन ग्रंथांत आलेला आहे. वि.भि. कोलते यांनी ''बडुवा'', 'भोपी', 'पुजारी'[४] असा अर्थ दिला आहे. 'श्री गोविंदप्रभुचरित्रा'तील या शब्दाचा व.दि. कुलकर्णी यांनी 'पुजारी', [५] असा अर्थ सांगितला आहे. या अर्थाला व्युत्पत्तीची जोड दिलेली नाही. उपर्युक्त ग्रंथातील 'बडुवा' हा शब्द येणाऱ्या लीळेवरून अर्थास बळकटी मिळते. 'बडुवा' हा देवस्थानातील दहा सेवकारांपैकी एक होता, हे राम दरणेयाने सर्वज्ञांना दिलेल्या दहा सेवेकारांच्या उल्लेखावरून स्पष्ट होते. [६]

'बडुवा' या शब्दाचे मूळ शोधताना 'बडव' या कन्नड मधील देशी शब्दाकडे जाणे आवश्यक आहे. 'बडव' म्हणजे ' "a poor, ill-conditioned. miserable, weak

man" [७] हे वर्णन तत्कालीन पुजाऱ्याबाबत (तो अर्थहीन असला, तरी) सार्थ ठरणारे आहे.

'लीलाचरित्र' पूर्व काळातील या शब्दाचा कन्नड मधील वापर म्हणजे बसवण्णांचे पुढील प्रसिद्ध वचन

*"उळळवरू शिवालय माडुवरु,*
*नानेन माडुवे बडवनय्या." [८]*
*(धनि बांधिती शिवमंदिर*
*निर्धन मी बांधु काय?)*

*स्वकृत अनुवाद.*

पुरंदरदासांनी आपल्या एका पदात विठ्ठलाला विचारिले आहे,

*"ना न्याके परदेशी? ना न्याके बडव*
*श्रीहरि श्रीनिधि इनि इरुव तनक"*
*(का मी परदेशी? का मी गरिब?*
*श्रीहरि श्रीनिधि तू असशी तोवर)*

*स्वकृत अनुवाद*

पुरंदरदास पंढरपूरच्या विठ्ठलाचे परमभक्त अणि निकट संबंधित, त्यामुळे 'बडव' या शब्दाच्या वापरामागे पंढरपूरच्या विठ्ठल मंदिरातील बडव्यांचा अबोध मनातील संदर्भ असावा. कदाचित एखादा अनुभवही.

बहिरट-भालेराव यांनी 'बडवे' हे घराणे सात-आठशे वर्षांपूर्वी कर्नाटकातून पंढरपुरास आल्याचा निर्देश केलेला आहे. तसेच, वंशावळीतील आधीच्या नावात 'तिमप्पा' हे निर्विवाद कन्नड वळणाचे नाव आढळते, हाही 'बडव' शब्दाकडे नेणारा सबळ आधार होय.

'गाऊ' हा शब्द 'लीळाचरित्रा'त आणि 'श्री गोविंदप्रभुचरित्रा'त आलेला आहे. या शब्दाचा 'चार कोसांचे अंतर' असा अर्थ वि.भि. कोलते [११] आणि व.दि. कुलकर्णी [१२] यांनी दिलेला आहे.

महानुभावानंतर हा शब्द 'श्री गुरुचरित्रा'त 'वीस गावे भेटीशी आल्ये'[१३] या चरणात आढळतो. येथील 'गावे' हे 'गाव' चे अनेकवचन नव्हे. 'गाउ' या शब्दाचे 'लीळाचरित्रा'तील [१४] 'दो गाउवां', 'चौ गाउवां' यांसारखे अनेकवचन आहे.

हल्याळ-परिसरातील मराठीत 'वावाला चुकला, तो गावाला चुकला', या म्हणीच्या रूपाने 'गाउ' आजही प्रचलित आहे. 'वाव' म्हणजे एका रेषेत दोन हात पसरले, की होणारे अंतर. हे मोजताना चुकतो, तो कोसांचे अंतरही चुकणारच. 'गाउ' शब्द 'गावद', 'गावुद' असा देऊन, किटेलने '10 to 12 English Miles' असा त्याचा अर्थही सांगितला आहे. [१५] 'ऊरू हारौदऊ गावुदक्के कडिमेये?' ही म्हणही किटेलने उद्धृत केलेली आहे. कुमारव्यासांनी [१६] जसा हा शब्द उपयोजिला आहे, तसाच,

अंबिकातनयदत्त (द.रा.बेंद्रे) [१७] यांनीही 'गावुद गावुद गावुद मुंदे', या पंक्तीत वापरलेला आहे.

'बडुवा' आणि 'गाउ' ही 'देशी'च्या खाणीतील शब्दरत्ने आहेत. त्यांच्यात 'अर्था'चा वेध निकटची देशीकार लेणी न्याहाळून घेतला पाहिजे. अन्यथा शोधाच्या वाटा उजळण्याऐवजी काजळण्याची शक्यताच अधिक आहे. दीपस्तंभ दिपवतात, तेव्हा मातीच्या पणत्याच नेमका मार्ग दाखवतात.

## संदर्भ


१. ग्रंथमाला. वर्ष १२, अंक१, पृ. ५१
२. भा.पं. बहिरट - प.ज्ञा. भालेराव, वारकरी संप्रदाय : उदय व विकास, व्हीनस प्रकाशन, पुणे १९७२ पृ. १७
३. सकलसंतगाथा, (सं.) रा.चिं. ढेरे, खंड ५वा, वरदा प्रकाशन, पुणे, १९८३, श्री संतगाथा, पृ. १४८
४. 'लीळाचरित्र (सं.) वि.भि. कोलते, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, १९७८. शब्दकोश, पृ. ८९८
५. श्री गोविंदप्रभुचरित्र, (सं.) व.दि. कुलकर्णी, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९८०, पृ. ९५
६. लीळाचरित्र उपर्युक्त, लीळा पूर्वार्ध ७४, पृ. ६७
७. Kittel's Kannada English Dictionary, (Ed.) Mariyappa Bhat, Vol. III University of Madras. 1975 P. 1132.
८. 'भक्तिभंडारी बसवण्णनवर वचनगळु' (सं.) डॉ. आर्.सी. हिरेमठ, कर्नाटक विश्वविद्यालय प्रकाशन, धारवाड, प्र.मु. १९७८, पृ. ३३३, वचन क्र. ८२०.
९. लीळाचरित्र, उपर्युक्त, लीळा (पूर्वार्ध) १५, १८७ आणि उत्तरार्ध ११, १२१.
१०. श्री गोविंदप्रभुचरित्र, उपर्युक्त, लीळा (पूर्वार्ध) १५, १८७ आणि उत्तरार्ध ११, १२१.
११. श्री गोविंदप्रभुचरित्र, उपर्युक्त, लीळा १. 'रिधपुर प्रांती दिदा गाउवा काटसरे''
१२. लीळाचरित्र, उपर्युक्त, शब्दकोध, पृ.८६७.
१३. श्री गोविंदप्रभुचरित्र उपर्युक्त 'गाव', ऐवजी 'बाव' असा मुद्रणदोष मात्र राहून गेला आहे.
१४. श्री गुरुचरित्र, (सं.) रा.कृ. कामत. के.भि. ढवळे, मुंबई, श. १८७६, अ-३२-१२९.
१५. Kittel's Kannada English Dictionary. P. 574.
१६. लीळाचरित्र, उपर्युक्त लीळा, उत्तरार्ध ११ पृ. ३४७
१७. कुमारव्यासांच्या या शब्दाच्या उपयोगासंबंधी वेगळ्या टिपणात चर्चा केली आहे. 'गावुद=बारा मैल दूर' कुमारव्यास भारत निघंटु, (सं.) त.सु. शामराव

बंगळूरु विश्वविद्यालय, बंगळूरु १९८१, पृ. १११.
१८. अंबिकातनय दत्त (सं.) वामान बेंद्रे, 'गरि', ७वी आवृत्ती, समाजपुस्तकालय, धारवाड, १९८२, पृ. ७६

**मराठी विभाग, गुलबर्गा विश्वविद्यालय,गुलबर्गा ५८५१०५.**

○○

**कानी पडलेला संवाद**

व्यापारी मंडळी स्वत:साठी आणि कर-अधिकाऱ्यांसाठी अशा हिशेबाच्या दोन दोन वह्या ठेवतात, असं आपण ऐकलं आहे. आता हे चित्र पाहा :

'अरे रोहित, काकांना परवा तू नमुना उत्तरपत्रिका लिहिल्या होत्यास, त्या जरा दाखव बरं.'

नंतर थोड्या वेळाने काका रोहितला म्हणतात :

'हे, रे, काय? 'The Gandhi were father of nation.'

'काका, मला माहीत आहे Gandhiji was the father of the nation असं लिहायला पाहिजे, ते!'

'तर मग?'

'आमच्या मिसनीच सांगितलंय् तसं बोर्डाच्या परीक्षेत लिहायला. त्या म्हणतात, तुम्ही बरोबर लिहिलंत, तर परीक्षकाला समजेल, असा भरवसा नाही. एखाद्या परीक्षकाला तुमचं चूक वाटलंच, तरी तो नक्की चालवून घेईल. तेव्हा The Gandhi वगैरे लिहिलेलं बरं.'

ही झाली इंग्रजीची स्थिती. आता मराठीची पाळी केव्हा येणार, हा प्रश्न आपण एकमेकाला विचारू या.

**लोकशिक्षा**

**साद आणि प्रतिसाद**

भाषा आणि जीवन ११:३ पावसाळा १९९३ मधील 'लोकशिक्षण मासिके : एक नोंद' या टिपणात 'लोकशिक्षण' हा शब्द आणि संकल्पना मराठीत प्रचारात कुठून आली, असा प्रश्न उपस्थित केला आहे.

त्या संदर्भात माझे स्नेही दिल्ली विद्यापीठातील प्रा. शिशिरकुमार दास यांनी पुरविलेली खालील माहिती रोचक वाटावी.

बंकिमचंद्र चटर्जी यांच्या एका निबंधाचे शीर्षक 'लोकशिक्षा' आहे. 'सामान्य जनांचे शिक्षण' या अर्थाने तो शब्द वापरला आहे. काल १८८०-८९ च्या सुमाराचा. पण बांग्ला भाषेतील हा त्या शब्दांचा सर्वांत जुना प्रयोग नसावा. चैतन्य महाप्रभूंच्या कोणा चरित्रकाराने हा शब्द वापरला असल्याचे त्यांना अंधूक स्मरते, काल १५५०- १६५० सुमाराचा. आजही तो बांग्ला भाषेत त्याच अर्थाने वापरतात.

दुसरीकडून मिळालेली एक माहिती म्हणजे विश्वभारतीने 'लोकशिक्षा' ह्या नावाची एक पुस्तकमालिका प्रकाशित केली होती : काल रवींद्रनाथ ठाकुर कार्यरत असताना.

अशोक रा. केळकर

# एक नावाचा शोध

शरदिनी मोहिते

एकदमच मला आठवण झाली आईच्या चुलीची. मातीची ही चूल कुंभारवाड्यातल्या माहितीच्या कुंभारणीकडून आणलेली असायची. सुबकपणा आणि देखणेपणाबरोबरच तिच्या खुरांचा भक्कमपणाही पारखून घेतला जायचा. खूरही चांगले भक्कम असून शिवाय नेटक्या आकाराचे हवेत. थबटके नसावेत आणि तरीही भांडी नीट तोलून धरणारे हवेत... ही चूल सुटी सडी चूल असायची नाही. वैलचूल असायची. तीन खुरांची चूल ही खरी मूळ चूल आणि तिच्या डावीकडे असणारी चार खुरांची छोट्या आकाराची चूल ही वैलचूल. दोघींच्या मधे, आतल्या बाजूला असलेल्या पोकळीतून चुलीतला जाळ वैलाकडे जायचा. एकाच जाळावर दोन्हींकडे दोन प्रकारचे अन्न शिजायचे. जाळाची तीव्रता कमी-जास्त करण्याचं कसब सुगरणीच्या हाती अनुभवानंच आलेलं असायचं....

कट्ट्यावर चूल नीट रोवून, बसवून, सारवून घेतल्यावर हळद-कुंकू घालून तिची पूजा केली जायची. तिच्यावर देखण्या घाटाची भांडी चढवली जायची. सुरस सुग्रास अन्न रांधलं जायचं.... एकाच वेळी चुलीवर तवा ठेवायचा आणि वैलावर छोट्या भांड्यात दुसरे काही शिजायला घालायचे. किंवा दोन्हींकडे दोन काही तरी पदार्थ शिजत असलेले आठवते.... आज प्रेशर कुकर लावून एकाच वेळी दोन, तीन, चारही पदार्थ झटकन आणि सत्त्वांश न घालवता, कमी इंधन वापरून शिजवता येतात. एका मोठ्या भांड्यात तीन-चार भांडी एकावर एक ठेवून किंवा कोन साधून, एकाच पातळीवर ठेवूनही अन्न शिजवणे शक्य होते, ते कुकरचा वापर करून. शाळेत शास्त्र शिकत असताना पेपिनचे पाचकपात्र अभ्यासायला होते; परंतु ते ध्यानात राहिले, ते फक्त त्याच्या नावातल्या अनुप्रासामुळे! एकावर एक ठेवायला सोपी जावीत, अशा खाचा असलेली गोल, कमी उंचीची अशी ही भांडी फार काही वैशिष्ट्यपूर्ण आकार किंवा सौंदर्य नसलेली. पण भाकरीचे चतकोर पाडावेत, तसे एका गोलाचे तीन भाग केलेली कडीवाली ॲल्युमिनियमची भांडी स्वच्छ करायला अवघड वाटली, तरी वैशिष्ट्यपूर्णच म्हणायला हवीत.

ही सुधारणा तशी अलिकडची. काळ उलटेल, तशी तीही मागे पडून जाईल. परंतु पूर्वीच्या काळीही एकावेळी एका जाळावर दोन पदार्थांची सिद्धी करण्यात चांगलीच योजकता दाखवण्यात आली होती, हे नाकबूल करता येणार नाही.

...तर झाले काय, चुलीची आठवण झाली. चुलीवर चढलेली दोन भांडी

नजरेसमोर आली. पण त्यांतल्या एकाचे नावच आठवेना. एक नक्की टोप होता. तो पक्का लक्षात राहण्याचे कारण, म्हणजे लहानपणी टोप या नावाने भांडी या प्रकाराशी संबंध नसलेल्या दुसऱ्याच गोष्टी आठवायच्या. डोक्यावर चढवायचा टोप आठवायचा. जिरेटोप तर नुसत्या स्मरणमात्रानेही शिवप्रभूंची आठवण करून द्यायचा. साधा टोप, टोपी, टोपडे या गोष्टीही डोक्यावर चढवायच्याच. केसांचा टोप आमच्या लहानपणी स्त्रीपार्ट करणारे पुरुषनट घालायचे. हल्लीही व्यक्तिरेखेच्या गरजेनुसार निरनिराळे टोप चढवले जातात. एकेक टोप हजारो रुपये किमतीचा असू शकतो. टक्कल पडलेल्या किती तरी व्यक्ती रोज सुद्धा, टक्कल झाकण्यासाठी आणि रूप आकर्षक दिसावे, म्हणून.– आता यामुळे खरोखरच आकर्षक दिसणारी व्यक्ती एखादीच म्हणा - टोपाचा वापर करतात... टोप या शब्दासरशी असले काही आठवायचे आणि वाटायचे, त्या टोपाशी या टोपांचे कसलेच साम्य नाही. कसलाही संबंध नाही. मग दोन्ही नावांची 'अक्षरवाटिका' तंतोतंत एकच कशी ? आकारामुळे ?

आणखी एक गंमत 'भांडी वाजली' या शब्दप्रयोगाची. स्वयंपाकघरात रागावलेल्या मर्दिनीकडून होणाऱ्या आदळआपटीला भांडी वाजली म्हणत नसून, तोफा गरजू लागल्या, की हा शब्दप्रयोग वापरायचा रिवाज आहे, हे ध्यानात आल्यावर वीरश्री अवाक्‌ होते!...

तर एक झाला टोप. नक्की टोपच. पण दुसरे कोणते भांडे ?.... आई रोज त्यात डाळ शिजत घालायची.... काय बरं होतं. अगदी डोळ्यांसमोर होतं; पण पितळेच्या, लहान तोंडाच्या, रूंद बुडाच्या त्या भांड्याचं नाव काही केल्या आठवेना. त्याचं काय ?

विचार करू लागले, आठवून पाहू लागले, तेव्हा मग मला आठवण झाली दासोपंतांची. दासोपंतांनी म्हटलं होतं -

*संस्कृतें घटु म्हणती। आता तया घटांचे भेद किती?*
*कवण्या घटाची प्राप्ती पावावी तेणे।*
*हारा डेरा रांजणू। मुढा पगडा आनू।*
*सगड, तौली सुजाणू। कैसी बोलेल?*
*घडी घागरी घडौवली। आळंदे वाचिकें बौळी।*
*चिटकी, मोरबा पातली, सांजवणेने।*
*ऐसे प्रतिभाषे वेगळाले। घट असती नामिथले।*
*एकें संस्कृते कळे कैसे न?*

अर्थात्‌च इतकी सगळी ही केवळ नावेच वेगवेगळी होती, असे नाही. या प्रत्येक नावामागे वेगळया आकाराचे, वेगळ्या रंगरूपाचे स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाचे भांडे उभे असते. लहान-मोठेपणाप्रमाणेच वेगळे रूपही आहे. त्या अर्थाने पाहिले, तर दासोपंतांनी आपल्यापुढे रचलेली पंधराव्या शतकातल्या विविध भांड्यांची उतरंड पाहून झाली आणि मला जाणवलं, की हारा, डेरा, रांजण, घडा, घागर, तौली, बौळी पातली (पातेली) यांचा वापर आजही सर्रास होतो आहे!... पण यांतही मला आठवत नसलेल्या त्या

भांड्याचा पत्ताच नाही.

आमच्या लहानपणी शहरात आणि खेड्यात वापरली जाणारी भांडी विविध प्रकारची आणि वैशिष्ट्यपूर्ण अशी होती. स्वयंपाक घरात कापणे, तोडणे, खरवडणे, चिरणे, ठेचणे, चेचणे, भाजणे, तळणे, लाटणे, वाटणे अशा एकेक भयानक क्रिया करत रससिद्धी करण्यासाठी वापरल्या जाणाऱ्या साधनांचा साठा विपुलच होता.... सुंदर देखणे, सुबक वेगळाले आकार धारण करणारी, 'शकुंतला' सारखी आकर्षक नावे धारण करणारी विशिष्ट आकाराची ही भांडी हल्ली भांड्यांच्या दुकानात व घरांतूनही सहसा आढळत नाहीत.. सतेली, पातेली, टोप, गंज, डेचकी, तामतौली, तौली, हंडा, कळशी, कासंडी, घागर, सुरई, रांजण, माठ, डेरा, गेळा (थंड,गार पाण्यासाठी ही सर्व भांडी), गुंड, दुंडा-दुंडी (आठवा नाथांची 'दुडी वर दुडी') बोळकी, लोटकी, मडकी,गाडगी, गडू, गडवा ('गडवा' म्हटलं, की मला कारण नसताना 'मितवा' आठवतो!) चहाचे कानवाले भांडे, कुंडा, पाटी, कढई, काहील, परात, तबक, ताट, ताटल्या, थाळया - यांनाच काही ठिकाणी 'पितळया' ही म्हणतात - या पितळेच्या बनवलेल्या असत, घंगाळ, ताम्हण, चमचे, पळया, डाव, ओगराळे, उलथणे, झारे, भात वाढणे, तांबे, फुलपात्र, पेला, पंचपात्र, पंचपाळे, वाडगे, वाट्या, लोटी-लोट्या म्हणजेच मोठी लोटी, डबे- गोल, पेढेघाटी, चपटे, उभे, चौकोनी - बरण्या, किटल्या, तवे, यांत घावनसाठी स्पेशल तवा आलाच; लाटणी, पोळपाट, काटवट ही लाकडाची बनवलेली असायची (काष्ठवतूचा काही संबंध असावा का?) खाली बसून पीठ जोरात मळता यावे, म्हणून काटवटीला दोन बाजूंना पाय ठेवायला दोन रचना असतात. खाली बसून दोन पायांचा रेटा देऊन काटवट पक्की धरून ठेवली, की पीठ चांगले मळायला चांगली जादा ताकद मिळू शकते; काटवटीसारखा आकार असलेल्या पितळेच्या परातीही पूर्वी मिळत असत. तऱ्हेतऱ्हेच्या चाळण्या, वेळण्या, रोवळया, गाळण्या, विळी, सुरी, खिसणी, कातणी, सोलणी, साल काढणी, खलबत्ते, पाटा, वरवंटा, सारे प्रकार घरातले; न्हाणीघरात बंब, हंडे, तपेली, बादल्या, घंगाळी अशा प्रकारच्या भांड्यांचा वापर रोज केला जात असे. कावळा या विचित्र नावाचे एक भांडे पंगतीत रस, शाक इ. वाढायला उपयोगी पडत असे. आता चक्क बादल्या वापरल्या जातात. (कावळयाप्रमाणेच चिमणीचा वापरही पूर्वी होत असे! पण कावळा हे एक भांडे होते, तर चिमणी म्हणजे एक वातीचा रॉकेलवरचा दिवा....)

कालौघात भांड्याचे कितीतरी प्रकार गायब झाले. वैशिष्ट्यपूर्ण आकाराचे, आगळेच व्यक्तिमत्त्व धारण करणारे पूर्वीचे बंगले, वाडे नाहीसे होऊन एका ठरावीक प्रकारच्या, सिमेंटच्या टोलेजंग पण वैशिष्ट्यहीन इमारती निर्माण झाल्या, त्याचप्रमाणे, तसाच ठोकळेबाजपणा भांड्यांच्या बाबतीतही आला. स्टील, हिंडालियम प्रत्यक्ष धगीवर चढण्यासाठी वाढपासाठीही सज्ज झाले. मिरपूड, मीठ, इ. साठी सुबक बाटल्या, पाण्यासाठी जग, बंपर यांचा ताफा जेवणाच्या टेबलावर तळपू लागला. कुकर, मिक्सर, पुरणयंत्र यांनाही महत्त्वपूर्ण जागा प्राप्त झाल्या. इडलीपात्र, अप्पेपात्र ही वळणावळणाने

येऊन ठेपले.

सर्वांत विशेष म्हणजे आमच्या आज्या-पणजांच्या कधी स्वप्नातही आला नसेल, असा एक विविधरंगी प्रकार अस्तित्वात आला. तो म्हणजे प्लॅस्टिक. सुबकपणा, देखणेपणा, तकाकी, चकाकी, वजनातला हलकेपणा या वैशिष्ट्यांबरोबरच स्वतःच्या बऱ्याच प्रमाणातल्या तकलुदीपणामुळे वापरणाऱ्याच्या मनात, काही प्रमाणातली का होईना, एक प्रकारची बेपर्वाई घेऊन आलेला हा प्रकार अनेक मनमोहक रंगांचे जणू इंद्रधनुष्य नाचवत आला. भांड्याला एखादा पोचा आला, तर स्वतःला जखम झाल्याप्रमाणे उठणारी कळ गेली कुठल्या कुठे, उलट पडला तडा, तर द्या फेकून, आणा नवी वस्तू, हा प्रकार अगदी सहज आला. गळक्या बादलीला बुडे बसवून देणारे गेले कुठच्या कुठे! प्लॅस्टिकच्या अशा बादल्यांचा वापर होऊ शकत असला, तर कोरड्या वस्तू साठवायला, झाडांसाठी कुंड्या म्हणून, किंवा कागदाचे कपटे, कचरा यांसाठी, पण त्या कामासाठीदेखील प्लॅस्टिक सज्ज आहेच. आकर्षक रूप घेऊन. मग तडा गेलेल्या वस्तू सरळ केरात रवाना, फारच विचार असला, तर रद्दीच्या दुकानात किंवा भंगारवाल्याकडे....

'फुटक्या तपेली'वर कवनं रचण्याचे दिवस इतिहासात जमा झाले म्हणा ना...

हो. हो. आठवलं आता. वरणासाठी डाळ शिजत घालायला आई रोज वापरायची, सुंदर उभ्याशा घाटाचे पितळी भांडे म्हणजे तपेली होती. आपल्या शेजारणीपेक्षा देखील सुंदर घाट असलेली ही छोटी तपेली म्हणजे आईचा अतिशय प्रेमाचा व अभिमानाचा विषय होती. कधी कधी तिच्यात डाळ शिजायला ठेवून तिच्यावरच घातलेला टोप पाणी गरम करायला म्हणून ठेवायची ती.... आठवलं, की. न आठवायला काय झालं? ज्या तपेलीत शिजलेल्या डाळीचं वरण खाता खाता कवि सोपानदेव चौधरी म्हणाले होते,

''वा! वा! मला तर म्हणावं वाटतं, वरणात खरोखर जग जगते.''

ती तपेली आत्ता डोळ्यांसमोर उभी आहे माझ्या. पाहा ना, इतका वापर होऊन देखील तिच्यावरचे ठोके चमकताहेत पैलूंप्रमाणे... तिची आठवण व्हायला वेळ लागला, कारण हल्लीच्या प्रथेप्रमाणे तांब्या-पितळेच्या वस्तू म्हणजे दिवाणखान्यातल्या सजावटीच्या महागड्या वस्तू. तिची स्थापना आम्ही तरी फ्लॉवरपॉट किंवा तत्सम वापराची वस्तू म्हणून केलेली नाही. ती बसली आहे स्वयंपाकघरातल्या उंच फळीवरच्या मागच्या रांगेत, तिथूनच हसते आहे मनातल्या मनात. आपली आठवण आज तरी झाली, म्हणून.. तिला खाली काढून, चिंचेनं घासून मी आजच तिच्यात डाळ शिजवणार. वरण करणार. चूल गॅसची असली, म्हणून काय झालं?

**२०९५, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.**

○○





अनुक्रमणिका

# साद आणि प्रतिसाद

- गौरी देशपांडे

**संपादक, भाषा आणि जीवन यांस**

**संदर्भ :** वर्ष ११ : अंक ४ : दिवाळी १९९३

हा अंकही, इतर अंकांप्रमाणे अथपासून इतिपर्यंत वाचला. प्रत्येक लेखात काही ना काही वाचण्याजोगे, विचारांना चालना मिळण्याजोगे होतेच, म्हणून आभार.

त्यांपैकी दोन लेखांबद्दल काही लिहावेसे वाटले.

१. मनोहर राइलकर यांचा 'सल'. महाराष्ट्र टाइम्समध्ये काही दिवसांपूर्वी ''दोन दिवसांत मान्सून सक्रिय होणार'' हा मथळा वाचून संताप आला, आणि ''दोन दिवसांत पावसाळा सुरू होणार'' असे सरळ मराठी कुणाला सुचू नये, याचे वैषम्य वाटले, त्याची आठवण झाली. त्यांच्याशी मी बहुतांश सहमत आहे, तरी काही मुद्दे उपस्थित करावेसे वाटतात, ते असे :

**अ :** भूत - भूत काळ. 'सरळ मराठी' बोलणाऱ्या किंवा लिहिणाऱ्या व्यक्तीला अधून मधून हा वापरावा लागला, तर फार पंचाईत पडत नाही आणि वेळप्रसंगी ती तो स्वाभाविकरीत्या वापरते. पण जर 'आठवणी सांगणे (Flashback)' या प्रकारचे दीर्घ निवेदन करायचे असले (उदा. कादंबरीत), तर दर वाक्याशेवटी सतत येणारे 'होते, होते' खटकत राहते. त्याला पर्याय म्हणून पहिल्या एक-दोन वाक्यांत 'भूत-भूत' वापरून मग साध्या 'भुताचा' आधार घ्यावा लागतो. एकूणच मराठीला 'भूत-भूत काळ' भावणारा नाही, असे वाटते.

**आ :** लिखित मराठीतून अनुच्चारित अनुस्वारांची उचलबांगडी झाल्यामुळे जे समजुतीचे घोटाळे होण्याची शक्यता निर्माण झाली आहे. (उदा. ''का'' वि. ''कां''), त्यांतला एक घोटाळा 'माझे कपडे तुझ्यापेक्षा चांगले आहेत' या वाक्यात आढळतो. पूर्वीच्या (मी शाळेत शिकले, त्या) मराठीत 'झ्या' वर अनुस्वार देता येत असे, त्यामुळे त्याचा संदर्भ 'तुझ्या' कडे नसून 'कपड्यां' कडे आहे, हे स्पष्ट होत असे. खुद्द संभाषणात या अनुस्वाराची गरज भासत नाही, कारण बोलणारी बहुधा हावभावांनी कपड्यांचा निर्देश करते. तसेच, या आधीच्या उदाहरणात 'वडलांना' याच्या आधी विशेषणाची गरज नाही, असे वाटले. किंबहुना जर ते वडील ऐकणाऱ्या व्यक्तीव्यतिरिक्त इतर

कुणाचे वडील असतील, तरच त्याआधी 'माझ्या', 'तुझ्या', 'बाळूच्या' वगैरेंची गरज भासेल, एरवी नाही.

**इ :** मराठीला लांब वाक्ये पेलत नाहीत, असे म्हणणे योग्य नाही. वचन/लिंग निगडित क्रियापदे, विशेषणे, सर्वनामे यांमुळे तर गुंतागुंतीची, पल्लेदार आणि तरीही समजायला सोपी वाक्ये मराठीत सहज लिहिता येतात. खेरीज, एक पूर्णविराम सोडता, इतर विरामचिन्हांनी मराठीत अलीकडेच पदार्पण केलेयं, हे खरे आहे; पण आता ती आपण आपलीशी केली आहेत, तर त्यांचाही लांब वाक्यांत योग्य वापर का करू नये? केवळ वाचणारे आळशी आहेत, म्हणून त्यांचे लाड करायचे? अशा रचनेमुळे निवेदनाला एक संथ लय आणि गंभीरपणा येतो, तो छोट्या वाक्यांच्या 'कशासाठी पोटासाठी' ठेक्यातून गायब होतो. डॉ. जॉन्सन यांच्या सुंदर, लांब, भारदस्त आणि तरी सुगम अशा एखाद्या पंधरा ओळींच्या वाक्याचे भाषांतर करताना तोडून पंधरा तुकडे केले, तर त्यांच्या शैलीचा काय आब राहिला? 'सोपे आणि सुटसुटीत' यांचा उदोउदो करण्यापायी लेखक आणि वाचक दोघीही आळशी होत जातात आणि भाषेचा बहुपदरीपणा, तिच्या वापराच्या अनेक खुब्या आणि शक्यता संकोच पावतात. अलीकडे टीव्ही वर "Sound-bite" नामक १५-२० सेकंदांचा लक्ष-वेधक प्रकार बोकाळला आहे. याच्या योगे कुठल्याही भाषणाचा, बातमीचा, माहितीचा मुद्दा तीन-चार चमकदार छोट्याशा वाक्यांत सांगितला जातो, कारण, म्हणे, ऐकणाऱ्या/पाहणाऱ्यांना फक्त तेवढाच काळ कुठल्याही निवेदनावर लक्ष केंद्रित करता येते. काय हा लक्षाचा दरिद्रीपणा! लेखनातही असे व्हावे; नव्हे, लेखक-वाचक-अभ्यासक- शिक्षक-समीक्षक यांनी त्याला उत्तेजनच द्यावे, ही खेदाची बाब आहे.

लांब वाक्ये मराठीला कशी झेपत नाहीत, याचे उदाहरण म्हणून राइलकरांनी जे वाक्य उद्‌धृत केले आहे, ते, खरे तर, बोजड, अस्वाभाविक आणि 'भाषांतरित' मराठीचे उदाहरण आहे. तेच जर जरा विचार करून, 'सुरुवातीस प्लमर आणि विमा-एजंटाचे काम केल्यानंतर आता [मग] लखपती गुप्तहेर-कथालेखक झालेले म्हणून प्रसिद्धी पावलेले टॉम क्लॅन्सी म्हणतात, की भरधाव गाड्या उडवणे, सुंदरींच्या तांड्यांत रममाण होणे, अनेक गुंडांचा चुटकीसरशी समाचार घेणे, वगैरे जेम्स बॉण्ड-टाइप बहादुऱ्या 'खऱ्या' गुप्तहेरांच्या आवाक्यातल्या नाहीत,' असे लिहिले (यातही सुधारणा शक्य आहेत!) तर ते लांब असूनही सरळ-सोपे दिसते आणि मूळ माहितीचा (आणि थोड्या उपहासाचाही) त्यात समावेश करता येतो. भाषांतर वाचताना, ते भाषांतर आहे, असे वाचकाला अजिबात वाटता कामा नये, या अट्टाहासापायी कित्येकदा मूळ संहितेचे आमूलाग्र 'रूपांतर' होते. लक्ष्य-भाषेत ते वाचताना खटकणार नाही, इतकी खबरदारी घेतल्यावर ते 'भाषांतर' आहे, याची वाचकाला जाणीव व्हायला हरकत नसावी.

२. विजया देव यांचा 'भाषिक खोड्या' या लेखात वर्णन केलेले 'नवे' शब्दप्रयोग,

खरे तर 'कौटुंबिक विनोद' या सदरात पडतात. ('चिमखडे बोल', 'छोट्यांचे मोठे बोल' इ. सदरात असतात. ते, व तसले) कुठल्याही कुटुंबात असे प्रसंगोत्पन्न विनोद व शब्दप्रयोग असतात, त्यांची सर्वसाधारण भाषिक नवप्रयोगांशी गल्लत होऊ नये. ज्या प्रसंगातून हे नवे शब्द उगवले, त्या प्रसंगी हजर असणारी मंडळी नाहीशी झाली, की हे शब्दही नाहीसे होतात. त्यांना 'ठकीसह तिंबूनाना', 'एक घाव, एक किंकाळी', 'संगीत चिवडामणी' अशा साहित्यातून भाषेचा एक भाग बनलेला नव्या शब्दप्रयोगांचा दर्जा व सातत्य नसते. लेख लिहून त्यांची फोड केली, तरी ते सरसकट वापरात येऊन भाषिक व्यवहाराचा एक भाग बनतील, असा संबंध नसतो, असो.

**३०३ कार्लाइल कोर्ट, क्लोव्हर व्हिलेज, वानवडी, पुणे ४११ ०४०**

○○

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी**

पृष्ठ ९५ :'ह्याच नोंदीत ('अतिवास्तववाद, ललितकलेतील') वापरलेल्या 'आपापतः' आणि 'आपापता' ह्या शब्दांवरील श्री.(वि.म.) बेडेकर ह्यांच्या टीकेसंबंधीही दोन शब्द सांगितले पाहिजेत. मूळ इंग्रजी शब्दांना नवनवे लेखक, नवनवे प्रतिशब्द वापरीत आहेत. नवीन शब्द संस्कृतोद्भव असू शकतात तसेच, ते बोलण्याचा किंवा ललित साहित्याच्या भाषेतून येऊ शकतील. 'आपोआप' ह्या मराठी शब्दाचे बोलीभाषेत एक रूप 'आपाप'. त्यापासून लेखक 'आपापता', 'आपापतः' हे शब्द बनवितो. हे शब्द आम्हांला मान्य असतीलच, असे नाही. पण लेखकाचे स्वातंत्र्य आम्ही घालवू इच्छीत नाही. कदाचित असे शब्द पुढे भाषेत चांगले रूढ होऊन घट्ट बसतील, अशीही शक्यता आहे. परिभाषेसंबंधीचे आमचे उदार धोरण आम्ही कोशात स्पष्ट केलेलेच आहे. (पृष्ठ ४) तथापि, वाचकांचा घोटाळा होऊ नये, म्हणून लेखकाच्या 'आपापता' शब्दाचा त्याला अभिप्रेत असलेला अर्थ तेथेच कंसात देऊन टाकला आहे. दुसरे असे, की जो प्रयोग संस्कृतमध्ये अशुद्ध ठरेल, तो मराठीतच अशुद्ध मानण्याचे कारण नाही. मराठीत संस्कृत-प्राकृतांचे मिश्रण झाल्याने मराठी अशुद्ध होऊ शकत नाही. संस्कृताचा मागोवा घेत जाण्याने मराठीची प्रकृती बिघडण्याचाच संभव अधिक.'

*('मराठी विश्वकोश - परिचयग्रंथ, अभिप्राय, टीका आणि प्रतिटीका', १९६५ - खासगी प्रसारण या पुस्तिकेमधून)*

**पैसे भरण्याबद्दल सूचना**

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता रक्कम आणि ती कशापोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

**पत्रिकेची वर्गणी**

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ६० रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षापैकी असो) १५रु.

परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.

परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.

सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

**परिषदेची वर्गणी**

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला, तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु. + २० रु. असे एकूण ६० रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी १०० डॉलर), हितचिंतकांसाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी २५० डॉलर) किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

**जाहिरातीसाठी दर**

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक 0-40048/83